# महाराष्ट्र विधानपरिषद

## दुसरे (पावसाळी) अधिवेशन, २०१८

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### अनुदानित माध्यमिक शाळेत शिक्षण सेवक म्हणून तीन वर्षाचा सेवाकाळ पूर्ण केलेल्या शिक्षण सेवकाच्या नियुक्तीबाबत

**(१) २९५३० (१२-०४-२०१७) श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अनुदानित माध्यमिक शाळेत शिक्षण सेवक म्हणून तीन वर्षाचा सेवाकाळ पूर्ण केलेल्या शिक्षण सेवकाची नियुक्ती अन्य अनुदानित शाळेत नियमित वेतन श्रेणीवर शिक्षक पदी करण्यात येणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अशा तऱ्हेने बदली होणाऱ्या शिक्षकांच्या नियुक्तीस वैयक्तिक मान्यता देतांना काही तांत्रिक अडचणी येतात, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शैक्षणिक अर्हता योग्य असलेल्या प्राथमिक शाळेतील तीन वर्षे पूर्ण केलेल्या शिक्षण सेवकास माध्यमिक शाळेत व माध्यमिक शाळेतील शिक्षण सेवकास उच्च माध्यमिक शाळेत नियमित वेतनश्रेणीत नियुक्त करण्यात येणार आहे, हे खरे आहे काय,

(४) तसेच, प्राथमिक शाळेतील नियमित वेतनश्रेणीतील शिक्षकास माध्यमिक शाळेत व माध्यमिक शाळेतील शिक्षकास उच्च माध्यमिक शाळेत संस्थेने नियुक्त केल्यास, वेतनास संरक्षण मिळण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१४-०३-२०१८)** : (१) अशा शिक्षण सेवकांची अन्य अनुदानित माध्यमिक शाळेत नियमित वेतनश्रेणीवर शिक्षक पदी नियुक्ती करता येते, हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.
(३) हे खरे नाही.
(४) अशाप्रकारे करण्यात आलेल्या नियुक्तीस दिनांक १५ सप्टेंबर, २०११ च्या शासन निर्णयानुसार वेतनास संरक्षण राहणार नाही.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**औषध नियंत्रण प्रयोग शाळेतील रिक्त पदे भरणेबाबत**

**(२) ३२१८८ (११-०८-२०१७) श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे** : सन्माननीय **अन्न व औषध प्रशासन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात मुंबई व औरंगाबाद येथे अन्न व औषध प्रशासनाच्या औषध नियंत्रण प्रयोगशाळा आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, औषध नियंत्रण प्रयोगशाळेतील वर्ग १ सह ३९ पदे रिक्त असल्याने मनुष्य बळावर कामाचा अतिरिक्त ताण येत असून मागील ३ वर्षापासून पदोन्नतीने भरावयाची पदेही भरण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन पदोन्नतीची व सरळसेवेची पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (१७-०३-२०१८) :** (१) होय.

(२) अन्न व औषध प्रशासनाच्या मुंबई येथील प्रयोगशाळेत वर्ग-१ ते वर्ग-४ या संवर्गातील एकूण ३६ पदे तर औरंगाबाद येथील प्रयोगशाळेत वर्ग-१ ते वर्ग-४ या संवर्गातील एकूण ०९ पदे सद्य:स्थितीत रिक्त आहेत.

दिनांक १४/०९/२०१७ च्या शासन आदेशान्वये प्रशासनातील ०५ वैज्ञानिक अधिकाऱ्यांना (गट-ब) वरिष्ठ वैज्ञानिक अधिकारी (गट-अ) या पदावर पदोन्नती देण्यात आलेली आहे.

(३) औषध नियंत्रण प्रयोगशाळेतील वरिष्ठ वैज्ञानिक अधिकारी, प्रशासकीय अधिकारी, वरिष्ठ तांत्रिक सहायक, विश्लेषण रसायन शास्त्रज्ञ या संवर्गातील सरळसेवेची व पदोन्नतीच्या कोट्यातील पदे भरण्याबाबत प्रशासनाच्या तसेच शासनस्तरावर कार्यवाही सुरू आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**कोल्हापूर येथील करवीर दुमाला रसद देणेबाबत**

**(३) ३३८८५ (०७-०८-२०१७) श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कोल्हापूर येथील करवीर पीठास दुमाला रसद बंद करण्याबाबत कोणतेही आदेश नसतांनाही दुमाला रसद बंद करण्यात आल्यावरून सदरील दुमाला रसद पुन्हा सुरू करण्याबाबतचे मार्गदर्शन जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी अवर सचिव, महसूल व वन विभाग (ज-५-अ) यांच्याकडे माहे जुलै, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान मागितलेले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, करवीर पीठास दुमाला रसद देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) असल्यास, मागील काळातील थकीत रक्कम व चालू रक्कम करवीर पीठास देण्याबाबतची कार्यवाही किती मुदतीत करण्यात येणार आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२८-०३-२०१८) :** (१), (२), (३) व (४) श्री.स्वामी जगद्‌गुरु शंकराचार्य पीठ, करवीर यांच्या प्रतिनिधींकडून दरवर्षी संबंधित गावी जाऊन तलाठी यांचेकडून दुमाला रसद वसूलीबाबत रितसर मागणी अथवा विचारणा केली जात असे व संबंधित गा. का. तलाठी यांचेकडून वसूल करणेत आलेला नियत जमीन महसूल प्राप्त करुन घेऊन त्याची रितसर पावती दिली जात असे. तथापि सदर दुमाला रसद प्राप्त करुन घेण्यासाठी करवीर पीठाकडून कोणतीही तजविज न केल्याने जमा करणेत आलेला जमीन महसूल शासन जमा केल्याचे दिसून येते. सदर दुमाला रसद पुन्हा चालू करण्याच्या अनुषंगाने मार्गदर्शन करण्याबाबत जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी दिनांक १५/०७/२०१५ च्या पत्रान्वये शासनाकडे विनंती केली आहे. तथापि, शासनाने सदर दुमाला रसद बंद केलेली नसल्याने ती पुन्हा चालू करण्याच्या अनुषंगाने शासनाचे नव्याने आदेश आवश्यक नाही.

---

**पालघर नगरपालिका क्षेत्रातील बेकायदा बांधण्यात आलेल्या टपऱ्याबाबत**

**(४) ३४०१४ (११-०८-२०१७) श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पालघर नगरपालिका क्षेत्रातील मनोर-माहिम आणि पालघर-बोईसर या राज्य मार्गावर बेकायदा टपऱ्याचे बांधकाम करण्यात आल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय.

(२) असल्यास, याची पाहणी शासनाने केली आहे काय व पाहणीच्या अनुषंगाने बेकायदेशीर बांधण्यात आलेल्या टपऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१६-०३-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) होय, नगरपरिषद क्षेत्रातील मनोर ते माहिम रस्त्यापैकी मनोर-पालघर भागात सा.बां.विभागाकडील रा.मा.क्र.३४ सा.क्र.१०/२०० ते सा.क्र.१२/२५० चा समावेश असून सदर लांबीमध्ये कोणत्याही प्रकारचे टपऱ्यांचे अतिक्रमण

झालेले नाही. तथापि, पालघर-माहिम भागात सा.बां. विभागाकडील प्र.रा.मा.क्र.४ सा.क्र.६०/०० ते सा.क्र.६२/७०० या भागात टपऱ्या यांना नोटीस देण्यात आलेल्या आहेत.

पालघर नगरपरिषद हद्दीतील पालघर बोईसर रस्त्यामध्ये प्र.रा.मा.क्र.४ चा सा.क्र.५८/४०० ते ६०/००० लांबीत सा.बां.विभागाच्या रस्त्याच्या रस्ता व बाजुपट्टी हया हद्दीबाहेरील जागेत टपऱ्या असल्याने, सदर टपऱ्याबाबत नगरपालिका, पालघर यांना कार्यवाही करण्याबाबत कळविण्यात आले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**अमरावती विभागातील शिक्षकांच्या वेतनाच्या फरकाची रक्कम व्याजासहित जमा करण्याबाबत**

**(५) ३४१८७ (१८-०८-२०१७) श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शिक्षण उपसंचालक, अमरावती यांनी क्र. वित्त क्र.२१५७८/२०१५, दिनांक २२ सप्टेंबर, २०१५ रोजी कक्ष अधिकारी, शालेय शिक्षण विभाग, यांना अमरावती विभागातील शिक्षकांना सहाव्या वेतन आयोगाच्या फरकाची रक्कम नवीन परिभाषित अंशदायी निवृत्तीवेतन योजना खात्यामध्ये व्याजासहित जमा करणेबाबत निवेदन दिले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग, दिनांक २९ नोव्हेंबर, २०१० नुसार खाजगी शाळांमधील (प्राथमिक/माध्यमिक/उच्च माध्यमिक) शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना नवीन परिभाषित अंशदायी निवृत्तीवेतन योजना लागू करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, खाजगी शाळेवर कार्यरत कर्मचाऱ्यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत, निवृत्तीवेतन लेखा क्रमांक देण्याची कार्यवाही करतेवेळी सहाव्या वेतन आयोगाच्या फरकाची रक्कम, नवीन परिभाषित अंशदायी निवृत्तीवेतन योजना खात्यामध्ये जमा करणेबाबत, शासनस्तरावरून किंवा शिक्षण संचालनालयाच्या स्तरावरून कोणतेही आदेश शिक्षण उपसंचालक कार्यालय, अमरावती विभाग यांना देण्यात आले नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अमरावती विभागातील शिक्षकांना सहाव्या वेतन आयोगाच्या फरकाची रक्कम नवीन परिभाषित अंशदायी निवृत्तीवेतन योजना खात्यामध्ये व्याजासहित जमा करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२२-०३-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) होय, हे खरे आहे. जिल्हा परिषद मान्यता प्राप्त १००% अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील सेवेत, दिनांक ०१ नाव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त झालेल्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना परिभाषित अंशदायी निवृत्तीवेतन योजना दिनांक २९/११/२०१० च्या निर्णयान्वये लागू केली आहे.
(३) व (४) १००% अनुदानित शाळातील ज्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची स्तर-१ मध्ये खाती उघडलेली आहेत, त्यांना सहाव्या वेतन आयोगाच्या फरकाची रक्कम जमा करण्यासाठी लेखाशिर्ष उघडण्याची कार्यवाही सुरू आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शिक्षकांच्या पाल्यांना उच्च शिक्षणाच्या शुल्काचा परतावा मिळण्याबाबत

**(६) ३५२३३ (०२-०१-२०१८) श्री.कपिल पाटील :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील शिक्षकांच्या पाल्यांना शिक्षणाच्या शुल्काचा परतावा देण्याच्या योजनेसाठी आवश्यक तरतूद करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, किती तरतूद अपेक्षित आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन मागील मागणीबाबतची थकबाकी अदा करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०८-०५-२०१८) :** (१), (२) व (३) राज्यातील प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिकस्तरावरील शिक्षकांच्या पाल्यांना शिक्षणाच्या शुल्काचा परतावा देण्याच्या योजनेकरीता जिल्हयांकडून मागणीनुसार जिल्हयांना अनुदानाचे वितरण करण्यात येते. तसेच जिल्हयांकडून सदर योजनेसाठी थकबाकी असल्याबाबतची मागणी प्राप्त झालेली नाही.
(४) प्रश्न उद्‍भवत नाही.

---

**फोर्ट (मुंबई) येथील सहनिबंधक कार्यालयातील गैरसोईबाबत**

**(७) ३५६५८ (०२-०१-२०१८) श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.प्रविण दरेकर, श्री.रामनिवास सिंह, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील फोर्ट, मल्होत्रा हाऊस येथील सहनिबंधक कार्यालयात अनेक पदे रिक्त असून प्रवेशाच्या ठिकाणी छतातून पाणी गळणे, पिण्याच्या पाण्याची व्यवस्था नसणे, पुरेशे पंखे नसणे इत्यादी सोयीसुविधांचा अभाव असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर कार्यालयात पुरेसा कर्मचारी वर्ग नसल्याने तेथील कर्मचाऱ्यांवर कामाचा अतिरिक्त ताण पडत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त सहनिबंधक कार्यालयातील रिक्त पदे भरून कर्मचाऱ्यांना अद्ययावत सोयीसुविधा पुरविण्यासाठी शासनाने काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (१४-०३-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) खरे आहे.
(३) व (४) वर्ग-३, वर्ग-४ कर्मचारी भरतीचे अधिकार सहनिबंधक कार्यालयास असून सन २०१६-१७ च्या सरळसेवा भरती करीता आकृतिबंधाला मंजूरी मिळावयाची आहे. मल्होत्रा हाऊस येथील जागा मालकाशी असलेला वाद न्यायप्रविष्ठ आहे. न्यायालयाच्या आदेशानुसार सदर जागेचे भाडे न्यायालयात

जमा करण्यात येत आहे. यास्तव जागा मालकाकडून सदर जागेची दुरुस्ती झालेली नाही. जागेच्या मालकाशी वाटाघाटी करुन कर्मचाऱ्यांना अद्यावत सुविधा पुरविण्यासाठी शासन प्रयत्नशील आहे.

---

**राज्यातील इनाम जमिनीवरील अतिक्रमणे निष्कासित करण्याबाबत**

**(८) ३६०८४ (०३-०१-२०१८) श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.सुभाष झांबड** : सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) निजाम काळात व ब्रिटीश राजवटीत गावसेवेच्या बदल्यात राज्यातील लोकांना उपजिविकेचे साधन म्हणून देण्यात आलेल्या इनामी जमिनीपैकी सुमारे एक लाख इनामी जमिनींवर शासकीय अतिक्रमण झाल्यामुळे इनामी जमीन धारकांवर फार मोठी आपत्ती ओढवलेली असून त्यांनी याबाबत आंदोलने केली आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून इनामी जमिनीवर होणारे अतिक्रमण रोखण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०३-०३-२०१८) :** (१) इनाम जमिनीवर शासकीय अतिक्रमण झाल्याची बाब निदर्शनास आलेली नाही.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**सहाव्या वेतनाची थकबाकी मिळणेबाबत**

**(९) ३६०९३ (०२-०१-२०१८) श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत** : सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील सन २००५ मध्ये अंशत: अनुदानित शाळेच्या कर्मचाऱ्यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना खाते न मिळाल्याने कपात बंद असून सहाव्या वेतन आयोगाची सन २००६ ते २००९ पर्यंतची थकबाकी न मिळाल्याने शिक्षकांचे आर्थिक नुकसान होत असल्याबाबत दिनांक ६ डिसेंबर, २०१५ रोजी वा त्यासुमारास प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग यांना अमरावती विभाग शिक्षक आघाडीने निवेदनाद्वारे विनंती केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सन २००५ मध्ये अनुदानित शाळेच्या कर्मचाऱ्यांच्या विविध मागण्यांविषयी मागणी होऊन सुद्धा मागणीकडे शासनाचे अक्षम्य दुर्लक्ष होत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन राज्यातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना मागणी केल्याप्रमाणे थकबाकी देण्याविषयी काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१७-०३-२०१८) :** (१) हे खरे नाही. असे निवेदन अप्राप्त आहे.
(२) हे खरे नाही.
(३) परिभाषित अंशदायी निवृत्तीवेतन योजनेंतर्गत टप्पा-१ ची कार्यवाही पूर्ण होत असून लवकरच टप्पा-२ सुरू करण्यात येत आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## काळी-पिवळी टॅक्सी व रिक्षा यांच्या प्रवासासंदर्भात खटुआ समितीने सादर केलेल्या अहवालाबाबत

**(१०) ३६११७ (०३-०१-२०१८) श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सार्वजनिक वाहतूक व्यवस्थेतील काळी-पिवळी टॅक्सी व रिक्षा मधून प्रवास करणाऱ्या प्रवाशांना सवलत मिळावी यासाठी शासनाने नेमलेल्या खटुआ समितीने माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान आपला अहवाल शासनाकडे सादर केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अहवालातील शिफारशींचे स्वरुप काय आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने भाडे नाकारणाऱ्या या प्रकारावर उपाययोजना करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (३१-०३-२०१८) :** (१), (२) व (३) राज्यातील ऑटोरिक्षा/टॅक्सीचे भाडेदर सूत्र विहित करण्याकरीता दिनांक १३/०४/२०१२ च्या शासन निर्णयान्वये श्री.पी.एम.हकीम यांच्या अध्यक्षतेखालील समितीने सादर केलेल्या अहवालानुसार भाडेदर व प्रत्यक्ष भाववाढ यांचा तुलनात्मक पुनर्विचार करुन बदललेल्या परिस्थितीनुरुप शिफारशी करण्याकरीता शासनाने दिनांक १०/१०/२०१६ चे शासन निर्णयान्वये राज्यातील ऑटोरिक्षा/टॅक्सींचे भाडेदर सूत्र विहित करण्याकरीता श्री.बी.सी.खटुआ, संचालक, मुंबई ट्रान्सफॉर्मेशन सपोर्ट युनिट यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत केली होती.

तद्नंतर उक्त समितीस महाराष्ट्र सिटी टॅक्सी नियम-२०१७ च्या नियम ११ नुसार राज्यात समुच्चयक टॅक्सींचे कमाल व किमान भाडेदर सूत्र निश्चित करण्याचे कामकाज दिनांक ०३/०६/२०१७ चे शासन निर्णयान्वये सोपविण्यात आले. त्यानुसार सदर समितीने त्यांचा अहवाल दिनांक ०९/१०/२०१७ रोजी शासनास सादर केला असून सदर अहवालान्वये टॅक्सी व ऑटोरिक्षा वाहन प्रवासाकरीता रास्त व वाजवी भाडे दररचनेची शिफारस केली आहे. तसेच दरसूत्र प्रस्तावित केले आहे.

भाडे नाकारण्याच्या प्रकारांना आळा घालण्याकरीता सदर समितीने जिल्हास्तरावर पोलीस अधीक्षक यांच्या तसेच आयुक्तालयस्तरावर पोलीस सह आयुक्त/उपायुक्त यांचे अध्यक्षतेखाली समिती नेमून त्यावर मोटार वाहन विभाग, वाहतूक पोलीस, टॅक्सी रिक्षा संघटना, ग्राहक मंच, न. प./म. न. पा. व प्रसार माध्यमे यांचे प्रतिनिधी नियुक्त करून दरमहा बैठक आयोजित

करून समकक्ष विषयाच्या अनुषंगाने ग्राहकाभिमुख अंमलबजावणीविषयक निर्णय राबवावेत अशी शिफारस केली आहे.

अहवालातील शिफारशींवर निर्णय घेण्याची बाब शासनाच्या कार्यवाहीखाली आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## समृध्दी महामार्गाला गती देण्यासाठी विशेष कंपनीची स्थापना केल्याबाबत

**(११) ३६५५७ (०३-०१-२०१८) प्रा.डॉ.तानाजी सावंत :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई ते नागपूर रस्ते वाहतूकीचे अंतर कमी करण्यासाठी समृध्दी महामार्ग या महत्वाकांक्षी प्रकल्पाला गती देण्यासाठी राज्य रस्ते विकास महामंडळाची दुय्यम कंपनी म्हणून सुपर कम्युकेशन एक्सप्रेस वे लि. या नावाने कंपनी स्थापन करण्याचा निर्णय शासनाने माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतलेला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर कंपनीची कंपनी अधिनियमांतर्गत नोंदणी करण्यात आलेली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, रस्ते विकास महामंडळ व सदरहू भागीदारी कंपनी यामध्ये काही सामंजस्य करार करण्यात आलेला आहे काय, सदर कराराची प्रमुख वैशिष्ठ, नियम व अटी काय आहेत,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१९-०३-२०१८) :** (१) दिनांक २२/११/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्गाकरीता नागपूर-मुंबई सुपर कम्युनिकेशन एक्सप्रेस वे लिमिटेड या नावाने विशेष उद्देश वाहन (SPV) स्थापन करण्यास मान्यता दिलेली आहे.

(२) होय.

(३) महाराष्ट्र शासन, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ व सदरहू भागीदारी कंपनी (SPV) यांच्यामध्ये करारनामा करण्याबाबतची कार्यवाही प्रगतीपथावर आहे.

(४) व (५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नांदेड जिल्ह्यातील गटविकास अधिकाऱ्यांकडून बदल्या केल्या जात असल्याबाबत

**(१२) ३७२७० (०२-०१-२०१८) श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, श्री.सुभाष झांबड, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नांदेड जिल्ह्यातील नांदेड पंचायत समितीतील गटविकास अधिकाऱ्यांकडून अंतर्गत बदल्यांसाठी कोणतेही कारण नसतांना काही कर्मचाऱ्यांच्या बदल्या केल्या जात असल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अनेक ग्रामसेवक आणि कर्मचारी यांना याबाबत मन:स्ताप होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने दोषी गटविकास अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२१-०३-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

पद रिक्त असलेल्या ग्रामपंचायतीचे कामकाज लगतच्या ग्रामपंचायतीच्या ग्रामसेवकाकडे अतिरिक्त कार्यभार सोपवून पार पाडले जाते.

(२) तशी कोणतीही तक्रार नाही.

(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अकोला जिल्हयासह पश्चिम व-हाडातील दुधाची आवक घटल्याबाबत

**(१३) ३७३०८ (०३-०१-२०१८) श्री.गोपिकिशन बाजोरीया : तारांकित प्रश्न क्रमांक ३२६५६ ला दिनांक ३१ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **दुग्धविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अकोला जिल्हयासह पश्चिम व-हाडातील दुधाची आवक घटल्यामुळे शासकीय दूध योजनेचे नुकसान झाल्याचे माहे नोव्हेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, गेल्या नऊ वर्षापासून दूध भुकटी प्रकल्प ठप्प असल्याने सध्या केवळ दूध योजना सुरू असल्याने ८२ अधिकारी व कर्मचाऱ्यांची पदे मंजूर आहेत व यापैकी विविध वर्गवारीतील एकूण २७ पदे रिक्त आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (२२-०३-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

अकोला दूध योजनेचे दूध संकलन कमी झाले आहे. शासकीय दूध योजनेचे नुकसान झालेले नाही.

(२) होय, खरे आहे.

(३) i) बंद पडलेल्या व बंद पडण्याची शक्यता असलेल्या शासकीय दूध योजनांचे पीपीपी तत्वावर पुनर्जिवन करण्यासाठी दिनांक २८/९/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये तांत्रिक सल्लागार नियुक्तीस मान्यता देण्यात आलेली आहे.

ii) विभागामार्फत घेण्यात आलेल्या पदांच्या आढाव्यामध्ये शासकीय दूध योजना अकोला येथील गट-क मधील ६ पदे समर्पित करण्याचे प्रस्तावित आहे.

iii) कार्यरत कर्मचारी दूध स्वीकृती, दूध वितरण, कार्यालयीन दैनंदिन कामकाजाच्या बाबी हाताळत आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील विद्यार्थ्यांचे शैक्षणिक कर्ज माफ करण्याबाबत

**(१४) ३७५४३ (०२-०१-२०१८) श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील विद्यार्थ्यांचे शैक्षणिक कर्ज माफ करुन त्यांच्या इतर काही मागण्या मान्य होण्यासाठी मा.लोकप्रतिनिधी तसेच विद्यार्थ्यांच्या पालकांनी संबंधिताकडे मागणी करण्यात येऊनही याप्रकरणी कोणतीही कार्यवाही करण्यात आली नसल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन विद्यार्थ्यांचे शैक्षणिक कर्ज माफ करून त्यांच्या इतर काही असलेल्या विविध मागण्या मान्य करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२८-०३-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) राज्यातील मान्यताप्राप्त पदवी व पदविका अभ्यासक्रमाच्या शिक्षण संस्थांमध्ये शिकणाऱ्या सामाजिक मागास व आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील पात्र विद्यार्थ्यांना शासनाकडून शिष्यवृत्ती/शिक्षण शुल्क प्रतिपूर्ती देण्यात येते.

राज्यातील मान्यताप्राप्त शैक्षणिक संस्थांमधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना वेतन अनुदान, शिष्यवृत्त्या इत्यादी शैक्षणिक योजनांवर शासनाकडून मोठ्या प्रमाणात खर्च करण्यात येत आहे. तंत्र शिक्षण संचालनालयांतर्गत असलेल्या व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या महाविद्यालयांमध्ये प्लेसमेंट सेल स्थापन करण्यात आले आहेत. त्याव्दारे विद्यार्थ्यांना रोजगाराच्या संधी गुणवत्तेनुसार उपलब्ध करुन देण्यात येत आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांना मॅट्रीकपूर्व व मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्तीची रक्कम वाढ करुन देण्याबाबत

**(१५) ३७६९२ (२६-०२-२०१८) श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील, श्री.संजय दत्त, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात वंचित समाजातील मुलांच्या शिक्षणाची सोय व्हावी याकरीता शासनाकडून विविध कल्याणकारी योजना राबविण्यात येत असून अल्पसंख्यांक समाजातील विद्यार्थ्यांना मॅट्रीकपूर्व शिष्यवृत्ती व मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती दिली जाते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अल्पसंख्यांक समाजाच्या विद्यार्थ्यांना शासनामार्फत देण्यात येणारी शिष्यवृत्तीची रक्कम सध्याच्या महागाईच्या मानाने अत्यल्प असून सदर रक्कम विद्यार्थ्यांना वेळेत दिली जात नसल्याने शिष्यवृत्तीची रक्कम वाढवून ती वेळेत मिळण्यासाठी शिष्यवृत्ती प्रक्रिया ऑनलाईन करण्यात यावी अशी मागणी विद्यार्थी व त्यांचे पालक तसेच लोकप्रतिनिधींनी शासनाकडे अनेकदा लेखी निवेदनाद्वारे तसेच जाहिररित्या केली असल्याचे दिनांक ७ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन प्राप्त झालेल्या तक्रारी व शिष्यवृत्तींची प्रक्रिया ऑनलाईन करण्याची लोकप्रतिनिधीची मागणी लक्षात घेता, शिष्यवृत्ती रकमेची प्रक्रिया ऑनलाईन करण्याबाबत तसेच शिष्यवृत्तीच्या दरामध्ये वाढ करुन सदर रक्कम वेळेत देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१५-०३-२०१८) :** (१) होय.

(२) नाही.

(३) व (४) अल्पसंख्यांक समाजातील विद्यार्थ्यांसाठी राबविण्यात येणारी मॅट्रिकपूर्व शिष्यवृत्ती योजना व मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती योजना या केंद्र पुरस्कृत योजना असून त्या ऑनलाईन पद्धतीने राबविण्यात येतात.

---

**वरिष्ठ महाविद्यालयातील प्राध्यापकांना आदर्श शिक्षक पुरस्कार प्रदान करुन दोन वेतनवाढी देणेबाबत**

**(१६) ३७९०० (१७-०२-२०१८) श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील, श्री.विक्रम काळे, डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात शिक्षकांच्या विविध कला गुणांना वाव देण्यासाठी शासनाने आदर्श शिक्षक पुरस्कार योजना सुरु केली असून उक्त योजनेपासून वरिष्ठ महाविद्यालयीन प्राध्यापक शिक्षकांना वंचित ठेवण्यात आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर योजना राबविण्यात येत असताना यामध्ये माध्यमिक शिक्षकांना दोन वेतनवाढ देण्याबाबत मा.उच्च न्यायालयाने शासनास आदेशित केल्याने सदर वेतनवाढ माध्यमिक शाळेतील शिक्षकांना देण्यात आल्या, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, वरिष्ठ महाविद्यालयीन प्राध्यापकांना दोन वेतनवाढ देण्याबाबत शासनाला अनेक निवेदन देण्यात आले आहे, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन वरिष्ठ महाविद्यालयातील प्राध्यापकांना दोन वेतनवाढ देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०६-०३-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) होय.

(३) होय.

(४) वरिष्ठ महाविद्यालयातील प्राध्यापकांना आदर्श शिक्षक पुरस्कार प्रदान करुन दोन आगाऊ वेतनवाढी देण्याचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला असता, वित्त विभागाने शालेय शिक्षण व क्रीडा विभागाकडून देण्यात येणारे आदर्श राज्य शिक्षक पुरस्कार हे प्राथमिक, माध्यमिक

शिक्षकांपुरतेच मर्यादित आहेत. त्यामुळे शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने उच्च व तंत्र शिक्षण विभागाने कार्यवाही करणे संयुक्तीक होणार नाही असे अभिप्राय दिले आहेत.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**गोंदिया जिल्ह्यातील बी.एड./बी.पी.एड. पदवीधर शिक्षकांना पदवीधर शिक्षक पदाचा मानीव दिनांक व वेतनश्रेणीचा लाभ देण्याबाबत**

**(१७) ३७९१९ (१७-०२-२०१८) श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.परिणय फुके :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) गोंदिया जिल्ह्यातील बी.एड./बी.पी.एड. अर्हता धारक ११ पदवीधर शिक्षकांना पात्र दिनांकापासून सेवाज्येष्ठतेनुसार पदवीधर शिक्षक पदाची मानीव दिनांक व वेतनश्रेणीचा लाभ देण्याबाबतचा प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया यांनी दिनांक २९ जुलै, २०१७ रोजी विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर विभाग यांचेकडे पाठविला होता, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू प्रस्तावात त्रुटी असल्याने उपायुक्त आस्थापना नागपूर विभाग, नागपूर यांनी दिनांक २१ ऑगस्ट, २०१७ रोजी सदरहू प्रस्ताव त्रुटींच्या पुर्ततेकरीता दिनांक १९ ऑगस्ट, २०१७ रोजी मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. गोंदिया यांच्याकडे परत पाठविला, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदरहू प्रस्तावातील त्रुटींच्या पुर्तता करुन सुधारित प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. गोंदिया यांनी १ महिन्याचा कालावधी होऊनही सादर केला नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, याप्रकरणी नागपूर विभागाच्या लोकप्रतिनिधींनी दिनांक १५ ऑक्टोबर, २०१७ रोजी उपायुक्त (आस्थापना), विभागीय कार्यालय, नागपूर यांना पत्र पाठवून मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. गोंदिया यांच्यावर दंडात्मक कारवाई करण्याबाबतची मागणी केली, हे ही खरे आहे

काय,

(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन उक्त प्रकरणास विलंब लावणाऱ्या मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. गोंदिया यांच्याविरुद्ध कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०८-०३-२०१८) :** (१), (२) व (३) हे खरे आहे.

(४) हे खरे नाही.

(५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. गोंदिया यांनी दिनांक ५/१/२०१८ रोजी त्रुटीची पुर्तता करुन मान्यतेसाठी प्रस्ताव विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांना सादर केला आहे.

(६) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यातील सार्वजनिक मान्यताप्राप्त ग्रंथालयांना १००% अनुदान देण्याबाबत**

**(१८) ३७९४५ (२६-०२-२०१८) श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ग्रंथालय कायदा व नियम अस्तित्वात आल्यापासून मान्यताप्राप्त सार्वजनिक ग्रंथालयांना वाढत्या महागाईनुसार यापूर्वी ५ ते ७ वर्षांनी १००% अनुदान वाढवून देण्यात येत होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सन २०१२-१३ मध्ये शासनाने फक्त ५०% अनुदान वाढ दिली असून ५०% वाढ मंजूर केलेल्या व त्रुट्या असलेल्या ५७०१ ग्रंथालयांना ही वाढ नाकारण्यात आली, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, त्रुट्या पूर्ण केल्यानंतर वाढ मान्य न झाल्याने मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशान्वये ५०% वाढ देण्याचे आदेश दिले असतानाही शासनाने सन २०१२-१३ व २०१३-१४ साठी मंजूर असलेली ५०% वाढ अद्यापपर्यंत दिली नाही, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त ५७०१ ग्रंथालयांना मंजूर असलेली ५०% वाढ शासन केव्हापर्यंत अदा करणार आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१४-०३-२०१८) :** (१) शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या परिरक्षण अनुदानात शासनाने प्रथम १९७९-८० मध्ये व त्यानंतर १९८९-९०, १९९५-९६, १९९८-९९ व २००४-०५ मध्ये त्या-त्या वेळच्या अनुदानाच्या दुपटीने वाढविण्याचा निर्णय घेतला आहे.

(२),(३) व (४) शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयाना अनुज्ञेय असलेल्या परिरक्षण अनुदानात दिनांक ०१ एप्रिल, २०१२ पासून विद्यमान दराच्या ५०**%** वाढ करण्याबाबतचा शासन निर्णय, दिनांक २१ फेब्रुवारी, २०१२ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

महसूल पडताळणीत त्रुटी आढळून आलेल्या तथा ग्रंथालय संचालनालयाकडून करण्यात आलेल्या फेरतपासणीत त्रुटींची पुर्तता करुन कार्यरत आढळलेल्या ५७०१ शासनमान्य ग्रंथालयांना ५०% अनुदान वाढ २०१४-१५ पासून लागू करण्याबाबत शासन निर्णय दिनांक ०७ जून, २०१४ निर्गमित करण्यात आला. तसेच न्यायालयीन प्रकरणी सदर त्रुटींची पुर्तता करुन कार्यरत आढळलेल्या ५७०१ शासनमान्य ग्रंथालयांना शासन निर्णय दिनांक २१ फेब्रुवारी, २०१२ नुसार दिनांक ०१ एप्रिल, २०१२ पासून देय असलेले ५०% वाढीव अनुदान देण्याबाबत शासन निर्णय, दिनांक १८ ऑगस्ट, २०१७ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. प्रत्यक्ष अनुदान वितरणाची कार्यवाही करण्यात आली आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील शारीरिक शिक्षकांची पदे भरण्याबाबत

**(१९) ३७९५७ (०९-०२-२०१८) श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील, श्री.विक्रम काळे, डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शिक्षक भरती प्रकिया ही अभियोग्यता चाचणीच्या माध्यमातून शासन राबवित असून मागील अनेक वर्षे शारीरिक शिक्षकाची पदे भरण्यात आलेली नाहीत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अभियोग्यता चाचणीमध्ये शारीरिक शिक्षकांना परीक्षा देण्यासाठी संधी देण्यात आलेली नाही, हे खरे आहे काय,
(३) असल्यास, शालेय विद्यार्थी आंतरराष्ट्रीयस्तराचे खेळाडू तयार करण्यासाठी शासनाकडून विविध योजना राबविण्यात येत आहेत, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शारीरिक शिक्षकांची भरती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०१-०३-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही.
(३) हे खरे आहे.
(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

### डॉ.धनराज माने, उच्च शिक्षण संचालक यांना निलंबित करण्याबाबत

**(२०) ३८०६१ (२५-०२-२०१८) श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) डॉ. धनराज माने, उच्च शिक्षण संचालक यांच्या निलंबिनाची घोषणा माहे मार्च-एप्रिल, २०१७ च्या उन्हाळी अधिवेशनात विधानसभेत करण्यात आली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, प्रत्यक्षात त्यांना निलंबन आदेश देण्यात आले नसून अधिवेशनातील विधानसभेच्या सभागृहात मा.मंत्री महोदयांनी केलेल्या घोषणेनुसार निलंबन आदेश न देण्याची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सभागृहात केलेल्या घोषणेनुसार निलंबन आदेश न दिल्याने सभागृहाचा हक्कभंग झाला असल्याने संबंधित दोषी अधिकाऱ्यांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०६-०३-२०१८) :** (१) होय.

(२) सदर प्रकरणी शासनस्तरावरून कार्यवाही सुरु आहे.

(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्‌यापीठातील पदोन्नती घोटाळ्याची चौकशी करण्याबाबत**

**(२१) ३८१३४ (२६-०२-२०१८) श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्‌यापीठाचे श्री.डी.के. अग्रवाल यांच्या पदोन्नतीत घोटाळा झाल्याचे दिनांक ११ नोव्हेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मा.राज्यपाल महोदयांनी या प्रकरणाची चौकशी करण्याचे आदेश दिले असताना विद्‌यापीठाने चौकशी अहवाल मा.राज्यपालांच्या निदर्शनास आणला नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी श्री.डी.के. अग्रवाल यांनी बेकादेशीर पदोन्नत्या घेऊन शासनाची दिशाभूल करून प्रोफेसर नसतांनाही बी.सी.यु.डी.च्या संचालकपदी त्यांची दिनांक ३ जून, २०१५ रोजी नियुक्ती करण्यात आली, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त गंभीर प्रकरणाची सखोल चौकशी करुन श्री.डी.के. अग्रवाल यांच्याविरुद्ध तसेच अहवाल निदर्शनास न आणणाऱ्या दोषींविरुद्ध कायदेशीर कारवाई करण्याची मागणी नागपूर विभागाच्या लोकप्रतिनिधींनी दिनांक २० नोव्हेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास शासनास निवेदन पाठवून केली, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्‌यापीठातील पदोन्नती घोटाळ्याची चौकशी करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१४-०३-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही.

बापूराव देशमुख अभियांत्रिकी महाविद्यालय या विनाअनुदानित महाविद्यालयातील अध्यापक, डॉ. डी.के. अग्रवाल यांना कॅस अंतर्गत देण्यात आलेल्या पदोन्नतीबाबत प्राप्त झालेली तक्रार मा.राज्यपाल कार्यालयाकडून योग्य त्या कार्यवाहीसाठी दिनांक ०९/०१/२०१३ च्या पत्रान्वये तत्कालीन कुलगुरूंना पाठविण्यात आली होती. कॅस (CAS) अंतर्गत देण्यात आलेल्या पदोन्नतीसंदर्भात विद्यापीठामार्फत नियुक्त समितीने चौकशी करून पदोन्नतीमध्ये अनियमितता असल्याबाबत अहवाल कुलगुरूंना सादर केला. तथापि, अहवाल पाठविण्याबाबत निर्देश नसल्याने सदरचा अहवाल विद्यापीठाकडून मा.राज्यपाल यांचेकडे पाठविण्यात आलेला नाही. उक्त समितीच्या अहवालावर तत्कालीन संचालक, बीसीयुडी यांनी तपासणी करून सदर पदोन्नती प्रचलित नियमानुसार झाल्याचे तसेच यामध्ये अनियमितता झाली नसल्याबाबत दिनांक २२/०५/२०१५ च्या पत्रान्वये सर्व संबंधितांना कळविले आहे.

(३) हे खरे नाही.

प्रश्नात नमूद श्री.डी. के. अग्रवाल हे प्राध्यापक पदावर कार्यरत असताना त्यांची प्रचलित नियमानुसार विद्यापीठातील संचालक, बी.सी.यु.डी. या पदावर नियुक्ती करण्यात आली होती.

(४) होय, हे खरे आहे.

(५) प्रश्न भाग (१), (२) व (३) पाहता, प्रस्तुत प्रकरणाची चौकशी विद्यापीठ स्तरावर समिती नियुक्त करून करण्यात आली असून श्री.अग्रवाल यांना देण्यात आलेली पदोन्नती व संचालक, बी.सी.यु.डी. या पदावरील नियुक्तीमध्ये अनियमितता झाल्याचे आढळून आले नाही. तथापि, याप्रकरणी आता दिनांक २०/०२/२०१८ च्या पत्रान्वये विद्यमान कुलगुरूंनी नव्याने तपासणी करण्याची कार्यवाही सुरू केलेली आहे. दरम्यान शासनास प्राप्त निवेदनाच्या अनुषंगाने संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडून अहवाल मागविण्यात आला आहे.

(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई शहरात बांधण्यात आलेल्या बायोटॉयलेटच्या देखभालीबाबत

**(२२) ३८६२५ (०३-०३-२०१८) श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.प्रविण दरेकर, श्री.रामनिवास सिंह :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील धारावी क्रॉस रोडवरील श्री गणेश विद्या मंदिर प्राथमिक शाळेत बसविण्यात आलेले लाखो रुपयांचे बायोटॉयलेट निकृष्ट दर्जाचे असल्याने तीन वर्षात त्याची दूरवस्था झाली असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर बायोटॉयलेट तत्कालीन राज्य शासनाच्या काळात म्हाडा प्रशासनाने "माझी मुंबई निर्मल मुंबई" या अभियानांतर्गत बांधले असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, म्हाडाने लाखो रुपये खर्च करून शाळेला बायोटॉयलेट उपलब्ध करून दिले परंतु, त्याला लागणाऱ्या इतर सुविधा उपलब्ध करून न दिल्यामुळे त्याची दूरवस्था झाल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार मुंबई शहरात बांधण्यात आलेल्या बायोटॉयलेटच्या देखभालीसाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (१९-०३-२०१८) :** (१) मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ यांच्या अहवालानुसार सदर बायोटॉयलेटची दुरवस्था ही प्रामुख्याने सभोवतालच्या झोपडपट्टीवासीयांकडून बायोटॉयलेटचा होत असलेला अतिवापर, मोडतोड तसेच योग्य त्या देखभाल व दुरुस्ती अभावी झाली आहे.

(२) सदर बायोटॉयलेट दलित वस्त्यांमधील शाळांना पाणीपुरवठा व स्वच्छता सुविधा पुरविण्याकरीता सन २०१२-१३ च्या निधी अंतर्गत बांधले आहे.

(३) व (४) सदर जागी रुपये ५.७५ लक्ष निधी खर्च करुन आवश्यक सर्व

सुविधांसह ४ आसनी बायोटॉयलेट बांधण्यात आले. सदर बायोटॉयलेटचा ताबा श्री गणेश विद्या मंदिर प्राथमिक शाळा व संत काकय्या विकास संस्थेस पुढील देखभाल व दुरुस्तीसाठी देण्यात आला आहे. बायोटॉयलेटची देखभाल व इतर दुरुस्तीची संपूर्ण जबाबदारी सदर संस्थेची आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे शहरातील सोनसाखळी चोरटयांच्या टोळीवर नियंत्रण ठेवण्याबाबत

**(२३) ३८७९९ (२३-०२-२०१८) श्री.अनिल भोसले, श्री.नरेंद्र पाटील, श्री.किरण पावसकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुणे शहरात वारंवार सोनसाखळी चोरीच्या घटनांमध्ये वाढ होत असून सोनसाखळी चोरटयांची टोळी सक्रिय झाल्याची बाब माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनामार्फत चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार सोनसाखळी चोरटयांवर नियंत्रण ठेवण्याकरिता कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१४/३/२०१८) :** (१) हे खरे नाही.

सन २०१६ मध्ये सोनसाखळी चोरीचे १४१ गुन्हे घडले त्यापैकी १३० उघडकीस आले तर २०१७ मध्ये ९७ गुन्हे घडले त्यापैकी ८७ गुन्हे उघडकीस आले आहेत.
(२) सोनसाखळी चोरटयांच्या टोळीवर नियंत्रण ठेवण्याकरिता खालीलप्रमाणे उपाययोजना करण्यात आल्या आहेत.

१. प्रादेशिक स्तरावर संबंधित अपर पोलीस आयुक्त हे त्यांचे प्रादेशिक विभागात दररोज कोंबीग ऑपरेशन आयोजित करतात.
२. पोलीस ठाणे प्रभारी अधिकारी हे त्यांच्या हद्दीतील अशा प्रकारच्या गुन्हे घडलेल्या भागात Z टाईप बॅरिकेटस लावून नाकाबंदी करतात.
३. संशयीत मोटरसायकलस्वार यांची खात्री करणे.

४. पोलिसांचे अस्तित्व गुन्हेगारांचे निदर्शनास येईल याकारीता पुरुष व महिला पोलिसांची गस्त वाढविणे.
५. गर्दीचे ठिकाणी पोलिसांची गस्त वाढविणे.
६. अटक आरोपीची माहिती संबंधित जिल्हयातील पोलीस स्टेशनला देणे.
७. निवासी गृहसंकुलामध्ये नागरिकांच्या बैठका घेऊन चेन स्नॅचिंकच्या गुन्हांबाबत जागरुक करुन त्यांना सुरक्षिततेच्यादृष्टीने योग्य ते मार्गदर्शन करणे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नगरसूल (ता.येवला, जि.नाशिक) येथील ग्रामीण रुग्णालय इमारत व कर्मचारी निवासस्थानांमधील कामांचे अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत

**(२४) ३९३१२ (२३-०२-२०१८) श्री.जयवंतराव जाधव, श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ३४८८३ ला दिनांक ११ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नगरसूल (ता.येवला, जि.नाशिक) येथील ग्रामीण रुग्णालय इमारत व कर्मचारी निवासस्थानांमधील कामांचे अंदाजपत्रक व आराखडे उपसंचालक, आरोग्य सेवा नाशिक, मंडळ नाशिक यांनी माहे डिसेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचेकडे मंजुरीसाठी पाठविले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्रश्न भाग (१) मधील कामांना प्रशासकीय मान्यता देण्यासाठी स्थानिक लोकप्रतिनिधींनी माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान शासनाकडे मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (१२-०३-२०१८)** : (१) हे खरे आहे.
(२) हे खरे आहे.
(३) नगरसूल, तालुका येवला, जिल्हा नाशिक येथील मुख्य इमारत कर्मचारी निवास स्थान, दुरूस्ती, संरक्षक भिंत बांधणेच्या प्रस्ताव प्रशासकीय मान्यता व अनुदान उपलब्धतेसाठी प्रस्ताव शासनास दिनांक ०६/०३/२०१८ च्या पत्रान्वये प्राप्त झाला असून त्यावर कार्यवाही करण्यात येत आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**येवला (जि.नाशिक) येथील ग्रामीण रुग्णालयाचे श्रेणीवर्धन करून उपजिल्हा रुग्णालय बांधण्याबाबत**

**(२५) ३९३१३ (२३-०२-२०१८) श्री.जयवंतराव जाधव, श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक १९३२८ ला दिनांक १८ जुलै, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) येवला (जि.नाशिक) येथील ३० खाटांच्या ग्रामीण रुग्णालयाचे श्रेणीवर्धन करून १०० खाटांचे उपजिल्हा रुग्णालय बांधण्यासाठी शासनाने दिनांक २४ ऑक्टोबर, २०१६ रोजी प्रशासकीय मान्यता देवूनही माहे जानेवारी, २०१८ पर्यंत सदर बांधकामाबाबत निविदेबाबतची कार्यवाही करण्यात आलेली नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त दिरंगाईबाबत चौकशी करण्यात आली आहे काय,
(३) असल्यास, चौकशी अहवालानुसार जबाबदारी निश्चित करून सदर काम सुरु करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (१२-०३-२०१८)** : (१) हे खरे नाही.
येवला येथील ३० खाटांच्या ग्रामीण रूग्णालयाच्या श्रेणीवर्धन

बांधकाम निविदा प्रक्रिया करण्याबाबतची कार्यवाही सुरू आहे.

(२) प्रश्न उद्‌भवत नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## येवला (जि.नाशिक) तालुक्यातील दारिद्रय रेषेखालील लाभार्थींना घरकुलाचा लाभ मिळण्याबाबत

**(२६) ३९३१९ (२८-०२-२०१८) श्री.जयवंतराव जाधव, श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) येवला (जि.नाशिक) तालुक्यातील इंदिरा आवास योजनेतील लाभार्थी सन २०१६-१७ मध्ये मुळ प्रतिक्षा यादीत नसल्यामुळे ३४९१ दारिद्रय रेषेखालील लाभार्थींना घरकुलाचा लाभ मिळाला नाही, हे खरे आहे काय,
(२) तसेच माहे मार्च, २०१७ मध्ये ३४९१ वंचित लाभार्थ्यांपैकी २७० लाभार्थींना घरकुल बांधकामासाठी प्रशासकीय मान्यता मिळाली असून उर्वरित ३२२१ दारिद्रय रेषेखालील लाभार्थी प्रशासकीय विलंबामुळे घरकुलापासून वंचित राहिले आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने दारिद्रय रेषेखालील वंचित लाभार्थ्यांना घरकुलांचा लाभ मिळण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१३-०३-२०१८) :** (१) होय.
(२) नाही.
(३) येवला (जि.नाशिक) तालुक्यातील प्रतिक्षा यादीत नसलेल्या ३४९१ कुटुंबाना घरकुलाचा लाभ देण्यासंदर्भातील विगतवारी खालीलप्रमाणे आहे :-

१. दारिद्रय रेषेखालील एकुण लाभार्थी संख्या ३४९१
२. सन २०१५-१६ मध्ये इंदिरा आवास योजनेमधून लाभ दिलेले लाभार्थी २७०

३. सन २०१६-१७ मध्ये प्रधानमंत्री आवास आवास योजना (ग्रामीण) मधून लाभ दिलेले लाभार्थी ३९९
४. सन २०१६-१७ मध्ये रमाई अवास योजनेमधून लाभ दिलेले लाभार्थी ५
५. सन २०१६-१७ मध्ये शबरी आवास योजनेमधून लाभ दिलेले लाभार्थी १२
६. सन २०१७-१८ प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) मधून लाभ दिलेले लाभार्थी २४
७. ग्रामपंचायत स्तरावर “ड” प्रपत्रात समाविष्ट केलेले लाभार्थी २५५८
८. एकूण लाभार्थी पैकी अपात्र असलेले लाभार्थी २२३

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**नाशिक जिल्ह्यातील मंजूर आरोग्य संस्थांमधील आरोग्य कर्मचारी पदांचा आकृतिबंध मंजूर करण्याबाबत**

**(२७) ३९३६५ (०३-०३-२०१८) श्री.जयवंतराव जाधव, श्री.धनंजय मुंडे, श्री.अमरसिंह पंडित, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नाशिक जिल्ह्यातील मंजूर नवीन आरोग्य संस्थांची बांधकामे ८० टक्क्यांपेक्षा अधिक झाल्यामुळे तेथील स्थानिक लोकप्रतिनिधींनी दिनांक ५ जानेवारी, २०१८ व दिनांक १५ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास मा.मंत्री सार्वजनिक आरोग्य यांचेकडे आरोग्य कर्मचारी पदांचा आकृतिबंध मंजूर करण्याची मागणी केलेली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नाशिक जिल्हा परिषदेने उक्त आकृतिबंध मंजुरीचा प्रस्ताव दिनांक २१ जुलै, २०१६ व दिनांक ८ डिसेंबर, २०१७ रोजी आरोग्य सेवा संचालनालयास पाठविलेला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन आरोग्य कर्मचारी पदांचा आकृतिबंध मंजूर करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात

येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (१५-०३-२०१८) :** (१) हे खरे आहे.

लोकप्रतिनिधींनी नाशिक जिल्ह्यातील मंजूर नवीन प्राथमिक आरोग्य केंद्र व उपकेंद्रांची बांधकामे ८० टक्के पेक्षा अधिक झाल्यामुळे येथील आरोग्य कर्मचारी पदांचा आकृतिबंध मंजूर करणेबाबत दिनांक २०/१२/२०१७ च्या पत्रान्वये मागणी केली आहे.

(२) हे खरे आहे.

(३) नाशिक जिल्ह्यातील २ प्राथमिक आरोग्य केंद्रे व १३ उपकेंद्रांसाठी पदनिर्मितीस दिनांक ०२/०१/२०१७ च्या शासन निर्णयान्वये आणि ५ प्राथमिक आरोग्य केंद्र व ४ उपकेंद्रांसाठी पदनिर्मितीस दिनांक १६/०२/२०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## श्री संतश्रेष्ठ निवृत्तीनाथ महाराज संजीवन समाधी, त्र्यंबकेश्वर (जि.नाशिक) मंदिराच्या पुनर्निर्माणाबाबत

**(२८) ३९३६६ (०९-०२-२०१८) श्री.जयवंतराव जाधव, श्री.धनंजय मुंडे, श्री.अमरसिंह पंडित, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **पर्यटन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) त्र्यंबकेश्वर (जि.नाशिक) येथील श्री संतश्रेष्ठ निवृत्तीनाथ महाराज समाधी मंदिराच्या पुनर्निर्माण कामासाठी स्वतंत्र प्रशासकीय अधिकारी नेमण्याचा निर्णय घेतला जाईल असे मा.जलसंपदा मंत्री यांनी दिनांक १२ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास आश्वासन दिले होते, हे खरे आहे काय,

(२) तसेच, श्री संतश्रेष्ठ निवृत्तीनाथ महाराज संजीवन समाधी स्थळाचा ‘अ’ वर्ग पर्यटन स्थळामध्ये समावेश करण्याची स्थानिक लोकप्रतिनिधींनी माहे डिसेंबर, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान केलेल्या मागणीनुसार शासनाने जिल्हाधिकारी, नाशिक यांचेकडे प्रस्ताव मागविला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, प्रश्न भाग (१) व (२) बाबत शासनामार्फत चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (०५-०३-२०१८) :** (१) होय. तथापि सदर आश्वासन दिनांक १२ जानेवारी, २०१८ रोजी देण्यात आलेले आहे.

(२) नाही. तथापि, मा.लोकप्रतिनिधींनी समाधीस्थळी येणाऱ्या भाविकांना सोयी सुविधा उपलब्ध होण्यासाठी या स्थळाचा “अ” वर्ग तीर्थक्षेत्र/पर्यटन स्थळामध्ये समावेश करण्यासाठी शासनास प्रस्ताव पाठवावा अशी विनंती जिल्हाधिकारी, नाशिक यांच्याकडे केलेली आहे.

(३) व (४) प्रश्न भाग (१) बाबत देवस्थान विश्वस्त मंडळाकडून जिल्हाधिकारी, नाशिक यांना प्रस्ताव प्राप्त झालेला नाही. प्रश्न भाग (२) बाबत जिल्हाधिकारी, नाशिक यांनी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (उत्तर), नाशिक यांना सविस्तर प्रस्ताव/अभिप्राय सादर करण्याबाबत कळविले आहे.

---

## येवला (जि.नाशिक) येथे मागासवर्गीय विद्यार्थी आणि विद्यार्थीनींकरीता स्वतंत्र वसतिगृहे बांधण्याबाबत

**(२९) ३९३८३ (०३-०३-२०१८) श्री.जयवंतराव जाधव, श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ३०९४४ ला दिनांक २८ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) येवला (जि.नाशिक) येथे विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील विद्यार्थी आणि विद्यार्थीनींकरीता स्वतंत्र वसतिगृहे बांधण्यासाठी लोकप्रतिनिधींनी दिनांक १२ जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास केलेल्या मागणीच्या अनुषंगाने क्षेत्रिय कार्यालयाकडून अहवाल मागविण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त अहवालाच्या अनुषंगाने प्रस्तुत प्रकरणी विद्यार्थी आणि विद्यार्थीनींकरीता स्वतंत्र वसतिगृहे बांधण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (२०/०३/२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) राज्यातील प्रत्येक जिल्ह्याच्या ठिकाणी मुलामुलींसाठी शासकीय वसतिगृह सुरु करण्याचा शासनाचा विचार आहे. त्यासाठी आवश्यक असलेली जमीन उपलब्ध करुन देण्याबाबत संबंधित जिल्हाधिकारी यांना विनंती करण्यात आली आहे. त्याप्रमाणे अहमदनगर, नागपूर आणि यवतमाळ जिल्हाधिकाऱ्यांकडून वसतिगृहासाठी जागा उपलब्ध असल्याबाबतचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला असल्याने त्याठिकाणी वसतिगृह सुरु करण्याचा प्रस्ताव तपासण्यात येत आहे.

येवला हे नाशिक जिल्ह्यातील तालुक्याचे ठिकाण आहे. नाशिक जिल्ह्यामध्ये सुध्दा जागा उपलब्धतेबाबतचा जिल्हाधिकारी यांचा प्रस्ताव प्राप्त झाल्यास नाशिक येथे नवीन वसतिगृह सुरु करण्याचा प्रस्ताव तपासण्यात येईल.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुणेगांव-दरसवाडी-डोंगरगांव पोहोच कालव्याचे पूर्ण लांबीतील अस्तरीकरणाबाबत आणि जोड उपसा योजना क्र. ३ चे पाणी पुणेगाव धरणात वळविण्याबाबत

**(३०) ३९३८७ (०५-०३-२०१८) श्री.जयवंतराव जाधव, श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील, डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक ३४६९५ ला दिनांक १८ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ऊर्ध्व गोदावरी (जि.नाशिक) प्रकल्पामधील पुणेगांव-दरसवाडी-डोंगरगांव पोहोच कालवा प्रवाहीत होण्याच्या अनुषंगाने पुणेगांव डावा कालव्याची विस्तारीकरणाची ८ ते २५ कि.मी.मध्ये विविधस्तरावर प्रगतीपथावरील कामे व दरसवाडी-डोंगरगांव पोहोच कालव्याची ४३ ते ७० कि.मी. दरम्यानची प्रगतीत असलेली कामे पूर्ण झाली आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दिनांक १६ ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास लोकप्रतिनिधींच्या मागणीच्या अनुषंगाने पुणेगांव कालव्याचे पूर्ण लांबीतील अस्तरीकरणाचा अभ्यास म.सं.सं., नाशिक यांचेमार्फत करण्याबाबतचा प्रस्ताव तयार करण्याचे क्षेत्रियस्तरावर प्रगतीत असलेले काम पूर्ण झाले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) तसेच नाशिक जिल्ह्यातील जोड उपसा योजना क्र. ३ चे पाणी पुणेगाव धरणात वळविण्याबाबत स्थानिक लोकप्रतिनिधींनी दि १२ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास केलेल्या मागणीच्या अनुषंगाने क्षेत्रियस्तरावर तांत्रिक अभ्यास करण्याचे काम प्रगतीपथावर आहे, हे खरे आहे काय,
(४) असल्यास, चांदवड व येवला इ. अवर्षणग्रस्त तालुक्यांची गरज लक्षात घेवून पुणेगांव-दरसवाडी-डोंगरगाव पोहोच कालव्याचे पूर्ण लांबीतील अस्तरीकरणाबाबत आणि जोड उपसा योजना क्र. ३ चे पाणी पुणेगाव धरणात वळविण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१९-०३-२०१८) :** (१) पुणेगांव डावा कालव्यावरील कि.मी. ८ ते २५ मधील विस्तारीकरणाची कामे पूर्ण करण्याच्या दृष्टीकोनातून प्रापणसूची मंजूरी, निविदा पूर्व परवानगी, मुदतवाढ प्रस्ताव याबाबतची कार्यवाही प्रगतीपथावर असून, निधी उपलब्धतेनुसार विस्तारीकरणाची कामे हाती घेण्याचे नियोजन आहे. दरसवाडी पोहोच कालवा कि.मी. ४३ ते ६० मधील उर्वरित कामे सुरु करण्याबाबत क्षेत्रियस्तरावर कार्यवाही सुरु आहे. कि.मी. ६१ ते ७० मधील उर्वरित कामे प्रगतीपथावर असून जून, २०१८ अखेर पूर्ण करण्याचे नियोजन आहे.
(२) श्री.जयवंतराव जाधव, वि.प.स. यांनी दिनांक २२/९/२०१७ च्या पत्रान्वये अस्तरीकरणाची मागणी केली आहे.

पुणेगांव डाव्या कालव्याच्या पूर्ण लांबीतील अस्तरीकरणाचा समावेश उर्ध्व गोदावरी प्रकल्पाच्या मंजूर तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्तावात नाही.

त्यामुळे कालव्याच्या पूर्ण लांबीतील अस्तरीकरणाचा अभ्यास म.सं.सं., नाशिक यांच्यामार्फत करण्याचे काम क्षेत्रियस्तरावर प्रगतीत आहे.
(३) उपसा जोड योजना क्र.३ संदर्भात तांत्रिक अभ्यास व सर्वेक्षणाचे काम प्रगतीपथावर आहे.
(४) पुणेगांव-दरसवाडी-डोंगरगांव पोहोच कालव्याच्या पूर्ण लांबीतील अस्तरीकरणाचा समावेश उर्ध्व गोदावरी प्रकल्पाच्या मंजूर तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्तावात नाही. कालव्याच्या संपूर्ण लांबीतील अस्तरीकरणाबाबत क्षेत्रियस्तरावर अभ्यास करण्यात येत आहे. पार खोऱ्यातून गोदावरी खोऱ्यात पाणी वळविणाऱ्या उपसा जोड योजना क्र.३ चे सविस्तर सर्वेक्षण, अन्वेषण व प्रकल्प अहवाल तयार करण्याचे काम प्रगतीपथावर आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नाशिक येथे बनावट दाखले बनवून वितरीत करणाऱ्यांवर कारवाई करण्याबाबत

**(३१) ३९५३६ (२६-०२-२०१८) डॉ.अपूर्व हिरे :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नाशिक येथे पंचवटी भागातील गोदावरी चेंबर इमारतीमधील एका कार्यालयात प्रांताधिकारी, तहसिलदारांच्या बनावट शिक्क्याद्वारे बोगस शिधापत्रिका, जातीचे तसेच तत्सम दाखले बनवून ते वितरीत करणाऱ्या एका इसमास पुरवठा विभागाने दिनांक १० एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास छापा टाकून अटक केली व बनावट शासकीय कागदपत्रे, दाखले बनविणाऱ्या रॅकेटचा पर्दाफाश केला, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, तहसिलदार, प्रांताधिकारी यांच्या बनावट स्वाक्षऱ्या आणि शिक्के वापरुन जातीचे, उत्पन्नाचे, नॉन क्रिमिलेअर, राष्ट्रीयत्व, अधिवास प्रमाणपत्र त्याचबरोबर शिधापत्रिका इत्यादी शासकीय दस्तऐवज संबंधित

रॅकेटकडून वितरीत करण्यात आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार दोषींविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे, तसेच संबंधितांकडून अशा प्रकारे किती बनावट दाखले वितरीत करण्यात आली आहेत,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (१५-०३-२०१८) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.
(३) सदर प्रकरणी श्री.हरिशचंद्र रामचंद्र अग्रवाल व श्री.प्रमोद नार्वेकर यांच्याविरूध्द गुन्हा रजिस्टर नं.I/१४३, दिनांक १०/०४/२०१७ अन्वये गुन्हा दाखल करण्यात आला असून पोलीस चौकशी सुरू आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात बोगस शिधापत्रिकांची पडताळणी करण्याबाबत

**(३२) ३९५३७ (२६-०२-२०१८) डॉ.अपूर्व हिरे, प्रा.अनिल सोले : तारांकित प्रश्न क्रमांक ३१३३० ला दिनांक २५ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात दारिद्रय रेषेखालील शिधापत्रिकाधारकांची संख्या ६७ लाख ९६ हजार ८२२ इतकी असून दारिद्रय रेषेखालील शिधापत्रिकाधारकांसाठी उत्पन्नाची विहित मर्यादा असतांनाही बहुसंख्य दारिद्रय रेषेखालील लाभार्थ्यांनी उत्पन्नाचे प्रमाण कमी दाखवून दारिद्रय रेषेखालील शिधापत्रिका प्राप्त केल्याप्रकरणी शासनस्तरावरून पडताळणी करण्यात येवून अपात्र लाभार्थी वगळण्याची सुरु असलेली प्रक्रिया पूर्ण झाली आहे काय,
(२) असल्यास, किती अपात्र लाभार्थी असल्याचे पडताळणीत निदर्शनास आले, तसेच अपात्र लाभार्थी वगळण्याची प्रक्रिया अद्याप पूर्ण झालेली नसल्यास ती केव्हापर्यंत पूर्ण होणे अपेक्षित आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अपात्र लाभार्थी

वगळण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (१५-०३-२०१८) :** (१), (२), (३) व (४) राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियमांतर्गत लाभार्थ्यांची निवड करतांना अंत्योदय अन्न योजनेचे सर्व लाभार्थी तसेच बीपीएल गटातील सर्व लाभार्थींचा तर एपीएल (केशरी) गटातील ग्रामीण भागाकरीता रु. ४४,०००/- पर्यंत व शहरी भागाकरीता रु. ५९,०००/- पर्यंत कमाल वार्षिक उत्पन्न असणाऱ्या लाभार्थ्यांचा प्राधान्य कुटुंब गटातील लाभार्थी म्हणून समावेश करण्यात आला आहे.

राज्यात राबविण्यात येणाऱ्या सार्वजनिक वितरण व्यवस्थेचे संगणकीकरण प्रकल्पांतर्गत लाभार्थ्यांची माहिती पीडीएस डाटाबेसमध्ये सामाविष्ट करण्यात येत आहे. त्यानूसार राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम अंतर्गत १६२.६३ लक्ष पात्र शिधापत्रिकांपैकी १४७.५७ लक्ष तसेच दुष्काळग्रस्त जिल्ह्यातील ७.५२ लक्ष शेतकरी शिधापत्रिकांपैकी ६.९८ लक्ष शिधापत्रिकांचे आधार सिडींग पूर्ण करण्यात आले आहे. डाटा डिजीटायजेशन केल्यामुळे सुमारे १० लक्ष शिधापत्रिका या दुबार, मयत व प्रत्यक्ष गृहभेटीद्वारे अपात्र ठरल्याने वगळण्यात आलेल्या असून उर्वरित लाभार्थ्यांचे माहितीचे संगणकीकरण करण्याची व त्यानुषंगाने अपात्र शिधापत्रिका वगळण्याची कार्यवाही प्रगतीपथावर आहे.

---

## शहाड येथील पुलाच्या विस्तारीकरणाबाबत

**(३३) ३९६५२ (०१-०३-२०१८) श्री.जगन्नाथ शिंदे, अॅड.निरंजन डावखरे, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कल्याण व उल्हासनगर शहरातून जाणाऱ्या राष्ट्रीय महामार्ग क्र. २२२ वरील शहाड पुल ते म्हारळ नाका या पट्ट्यात अतिशय अरुंद रस्ता असल्याने मोठ्या प्रमाणावर होणारी वाहतुक कोंडी टाळण्यासाठी एमएमआरडीए मार्फत शहाड नाका ते म्हारळ नाका हा अरुंद रस्ता १०० फुट रुंद करण्यासाठी अतिक्रमण हटविण्याचे काम हाती घेण्यात आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याच मार्गावरील कल्याण शहराच्या प्रवेशद्वारावरील

उल्हासनदीवरील दुर्गाडी पुलाचे सहापदरीकरण करण्याचे कामही चालू आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, शहाड पुल अरुंद व दोन पदरी असून या मार्गावरून माळशेज, पुणे व अहमदनगर मार्गे वाहतुक होत असल्याने शहाड पुलावरील वाहतुक कोंडी टाळण्यासाठी व सदर पुलाच्या विस्तारीकरणाबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२०-०३-२०१८) :** (१) राष्ट्रीय महामार्ग क्र. २२२ हा महामार्ग केंद्रीय रस्ते वाहतुक व महामार्ग मंत्रालयाच्या अखत्यारीत आहे. या महामार्गावरील शहाड पुल ते म्हारळ नाका या रस्त्याचे रुंदीकरण करण्यासाठी सदर रस्ता उल्हासनगर महानगरपालिकेकडे हस्तांतरीत करण्याबाबतचा प्रस्ताव राष्ट्रीय महामार्ग मंडळाकडे सादर करण्यात आला आहे. सदर प्रस्ताव राष्ट्रीय महामार्ग मंडळाच्या विचाराधीन आहे. तद्नंतर, सदर रस्त्यावरील अतिक्रमणे हटविण्याचे काम उल्हासनगर महानगरपालिकेमार्फत करण्याचे नियोजित आहे.
(२) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत उल्हासनदीवरील दुर्गाडी पुलाच्या सहापदरीकरणाचे काम सुरु आहे.
(३) व (४) शहाड पुलाच्या रुंदीकरणाची बाब केंद्रीय रस्ते व वाहतुक व महामार्ग मंत्रालयाशी संबंधित असून सध्या सदर पुलाच्या रुंदीकरणाची बाब त्यांच्या विचाराधीन नाही.

---

## शासकीय भूखंड नाममात्र दरात विकासकांना उपलब्ध करून देण्याच्या निर्णयाबाबत

**(३४) ३९९८५ (०९-०३-२०१८) श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईसह राज्यात परवडणाऱ्या घरांच्या निर्मितीसाठी शासकीय भूखंड नाममात्र दरात विकासकांना उपलब्ध करून देण्याचा धोरणात्मक निर्णय

शासनाने नुकताच घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत विकासकांकडून जमिनीचा कोणताही मोबदला घेण्यात येणार नसून या जागेवर बांधलेले घर विक्री किंवा भाडे तत्वावर देण्यास विकासकास परवानगी देण्यात येणार आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, परवडणाऱ्या घर योजनेकरीता मुंबई महानगर क्षेत्रातील हरितपट्टे आणि ना-विकास क्षेत्र हे सुध्दा विकासकांना उपलब्ध करून देण्यात येणार आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, गेल्या चार वर्षात पंतप्रधान आवास योजनेची कोणतीही प्रगती नसताना वरील निर्णय हा केवळ विकासकांच्या हितासाठी घेण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (२२/०३/२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांसाठी म्हाडा, स्थानिक स्वराज्य संस्था, शासकीय व निमशासकीय संस्था या अंमलबजावणी करणाऱ्या यंत्रणांना शासकीय जमीन उपलब्ध करुन देण्याबाबत महसूल व वन विभागाने दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ रोजीच्या क्रमांक जमीन २०१६/प्र.क्र.२१३/ज-१ अन्वये शासन निर्णय निर्गमित केलेला आहे. तसेच राज्य शासनाच्या गृहनिर्माण विभागाने दिनांक ११ जानेवारी, २०१८ रोजीच्या क्र. प्रआयो-२०१७/प्र.क्र.१२/गृनिधो-२/शिकाना अन्वये निर्गमित केलेल्या शासन निर्णयाव्दारे राज्यातील सार्वजनिक जमिनीवर खाजगी विकासकांच्या सहभागातून परवडणाऱ्या घरांच्या निर्मितीबाबत खालील ६ प्रतिकृतींचा समावेश केलेला आहे.

१. शासकीय जमिनीवर अनुदानित गृहनिर्माण.
२. मिश्र विकसित क्रॉस अनुदानित गृहनिर्माण.
३. वार्षिक तत्वावरील अनुदानित गृहनिर्माण.
४. वार्षिकी तथा भांडवल प्रदान अनुदानित गृहनिर्माण.

५. प्रत्यक्ष मालकी तत्वावरील गृहनिर्माण.

६. प्रत्यक्ष भाडेतत्वावरील गृहनिर्माण,
तसेच खाजगी जमिनीवरील खालील २ प्रतिकृतींचा समोवश आहे.

१. कर्ज संलग्न व्याज अनुदानाच्या माध्यमातून (CLSS)

२. परवडणाऱ्या घरांची निर्मिती करण्याच्या माध्यमातून (AHP)

(२) गृहनिर्माण विभागाने दिनांक ११ जानेवारी, २०१८ रोजीच्या निर्गमित केलेल्या शासन निर्णयामधील सार्वजनिक जमिनीवर राबवावयाच्या प्रतिकृतीमध्ये निवड केलेल्या खाजगी विकासकास सार्वजनिक प्राधिकरण नाममात्र दराने दीर्घ मुदतीकरीता भाडेपट्टयाने भूखंड उपलब्ध करुन देण्याबाबत प्रतिकृती क्र.१, ३, ४, ५ व ६ मध्ये उल्लेख आहे.

प्रधानमंत्री आवास योजना ही मा.पंतप्रधान महोदयांची महत्वाकांक्षी योजना आहे. सदर योजनेंतर्गत PPP धोरणामुळे मोठ्या प्रमाणात घरकुलांची निर्मिती होणार आहे.

(३) गृहनिर्माण विभागाने दिनांक ११ जानेवारी, २०१८ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयामध्ये सार्वजनिक व खाजगी जमिनीवरील गृह प्रकल्पांसाठी अनुज्ञेय होणाऱ्या सवलतींनुसार सदर योजना हरीत/ना-विकास क्षेत्रात देखील राबविण्यात येणार आहे. मात्र सदर क्षेत्रात केवळ १ इतका चटई क्षेत्रफळ निर्देशांक लागू राहील, असे नमूद केलेले आहे.

(४) हे खरे नाही.

प्रधानमंत्री आवास योजना राज्यातील ३८२ शहरांमध्ये राबविण्याबाबत घेतलेल्या निर्णयानुसार राज्यात सन २०२२ पर्यंत १९.४० लक्ष घरकुलांच्या बांधणीचे उद्दिष्ट राज्य शासनाने ठरविलेले आहे. प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत घरकुलांच्या बांधकामास गती देण्यासाठी तसेच विहित उद्दिष्ट पूर्ण करण्याच्या अनुषंगाने केंद्र सरकारने सार्वजनिक, खाजगी भागीदारी (PPP) तत्वावरील प्रकल्पांसाठीचा ८ प्रतिकृती निर्गमित केलेल्या आहेत.

सार्वजनिक जमिनीवर राबवावयाच्या प्रकल्पांसाठी ६ प्रतिकृती असून, खाजगी जमिनीवर राबवावयाच्या २ प्रतिकृती आहेत. सार्वजनिक जमिनीवर राबविण्यात येणाऱ्या PPP प्रतिकृतीमध्ये राज्य शासन, स्थानिक नागरी स्वराज्य संस्था, निमशासकीय यंत्रणा इत्यादींच्या जमिनीवर खाजगी विकासकांच्या सहभागातून तसेच खाजगी जमिनीवर खाजगी विकासकांच्या

सहभागातून परवडणाऱ्या घरांची निर्मिती करण्याबाबत शासनाने दिनांक ११ जानेवारी, २०१८ रोजी शासन निर्णय निर्गमित केलेला आहे.

आजमितीपर्यंत राज्यातील एकूण ९४ प्रकल्पातील १,९७,८३१ (१४५२४३ EWS) घरकुलांना केंद्र शासनाने मंजुरी दिलेली आहे. सद्य:स्थितीत २८,१७९ घरकुलांचे काम प्रगतीपथावर आहे.

(५) व (६) प्रश्न उद्भवत नाही.

---

### राज्यात शालेय पोषण आहारात गैरव्यवहार झाल्याबाबत

**(३५) ४०३९९ (२६-०२-२०१८) श्री.परिणय फुके : तारांकित प्रश्न क्रमांक २५६५८ ला दिनांक ९ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात शालेय पोषण आहार अंतर्गत माहे फेब्रुवारी व ऑगस्ट, २०१३ याकालावधीत शाळेत मुलांना आहार देण्यासाठी खरेदी करण्यात आलेली ५३ कोटी ४९ लाख रुपयांची १२ कंत्राटदारांकडून खरेदी करण्यात आलेली ताटे निकृष्टदर्जाची असल्याचे शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था व भारतीय मानक विभाग यांनी केलेल्या तपासणीत निष्पन्न झाल्याचे महालेखापाल यांच्या कार्यालयामार्फत करण्यात आलेल्या लेखापरिक्षण अहवालामध्ये अशा स्वरुपाचा लेखा आक्षेप नमूद करण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, केंद्र शासनाच्या डायरेक्टर जनरल ऑफ सप्लाय ॲण्ड डिस्पोजल (डी.जी.एस.ॲण्ड डी.) दर करारानुसार सदर ताटांचा पुरवठा करण्यात आला असून केंद्र शासनाच्या दर करारातील नमूद परिमाणानुसार राज्य शासनाच्या मान्यताप्राप्त संस्थेकडून ताटांची पुरवठापूर्व व पुरवठापश्चात तपासणी केली असता अनुकूल तपासणी अहवाल प्राप्त झाले होते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, महालेखापाल यांच्या अहवालाबाबत विभागाचे अभिप्राय महालेखापाल कार्यालयास सादर करण्यात आला आहे काय, त्याचे थोडक्यात स्वरुप काय आहे,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही

केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१५-०३-२०१८) :** (१) व (२) हे खरे आहे.

(३) व (४) मा.महालेखापाल यांच्या कार्यालयामार्फत करण्यात आलेल्या संपादणूक लेखापरिक्षण अहवालामध्ये उपस्थित करण्यात आलेल्या लेखा आक्षेपाबाबत शासनाने अभिप्राय महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची कार्यवाही सुरु आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आम्रपाली गलांडे हिची राष्ट्रीय कबड्डीसाठी महाराष्ट्राच्या संघात निवड न झाल्याबाबत

**(३६) ४०५०० (०५-०३-२०१८) श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **क्रीडा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुण्याची सातत्यपूर्ण चांगली कामगिरी करणारी कबड्डीपट्टू आम्रपाली गलांडे हिची हैद्राबाद येथे झालेल्या राष्ट्रीय कबड्डी स्पर्धेसाठी महाराष्ट्राच्या संघात निवड होऊनही तिला आयत्या वेळी डॉक्टरांनी खेळता येणार नाही, असा अहवाल दिला नसतानाही तिला संघातून वगळण्यात आले असे सन २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कबड्डीपट्टू गलांडे हिच्यावर झालेल्या अन्यायाची शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले, तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१३-०३-२०१८) :** (१) नाही.

६५ व्या वरिष्ठ गट पुरुष/महिला राष्ट्रीय कबड्डी स्पर्धा दिनांक ३१/१२/२०१७ ते ०५/०१/२०१८ दरम्यान हैद्राबाद येथे पार पडल्या. सदर स्पर्धेच्या प्रशिक्षण सराव शिबीरात सहभागी महिला खेळाडू श्रीमती आम्रपाली

गलांडे यांना दिनांक २७/१२/२०१७ रोजी वैद्यकीय कारणास्तव त्यांच्याच सल्ल्याने संघ व्यवस्थापकाने स्थानिक डॉक्टरांकडे नेले होते. त्यांनी खेळाडूस विश्रांतीचा सल्ला दिला होता.तसेच सदर स्पर्धेचे प्रवेश अर्ज स्वीकारण्याची मुदतदेखील दिनांक २७/१२/२०१७ अशी होती. श्रीमती गलांडे यांच्या प्रकृती अस्वास्थ्यामुळे त्यांच्या स्पर्धेतील सहभागाऐवजी अन्य खेळाडूस ऐनवेळी संधी देण्याचा निर्णय महाराष्ट्र राज्य कबड्डी असोसिएशनने घेतला होता.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजे शिरगांव (सातपाटी) (ता.जि.पालघर) येथील जमिनींची विकासक भूखंड विक्री करीत असल्याबाबत

**(३७) ४०५८७ (१२-०२-२०१८) श्री.परिणय फुके :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे शिरगांव (सातपाटी) (ता.जि.पालघर) या ग्रामपंचायत हद्दीतील समुद्र किनाऱ्यालगत असलेल्या गट नं. ४२४ व ५३९ या जमिनीची भूमि अभिलेख विभागामार्फत निश्चिती न करता तसेच बिगरशेती न करता विकासक भूखंड विक्री असल्याबाबतची तक्रार सरपंच, ग्रामपंचायत सातपाटी व पंचायत समिती सदस्य यांनी जिल्हाधिकारी, पालघर व संबंधित पालकमंत्र्यांकडे केली असल्याचे माहे डिसेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी प्राप्त तक्रारीच्या अनुषंगाने मा.महसूल मंत्री यांनी सखोल चौकशी करुन शासनास अहवाल सादर करण्याचे जिल्हाधिकारी, पालघर यांना निर्देश दिले आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, जिल्हाधिकारी, पालघर यांचेकडून शासनास उक्त चौकशीचा अहवाल प्राप्त झाला आहे काय, तद्नुसार काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-०३-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
श्री.मुकेश शांताराम मेहेर, पंचायत समिती सदस्य यांनी दिनांक

१४/३/२०१७ रोजीचे निवेदन मा.मंत्री आदिवासी विकास विभाग तथा पालकमंत्री पालघर जिल्हा यांचेकडे सादर केले आहे. तसेच दिनांक २०/६/२०१७ रोजीचे निवेदन मा.मंत्री महसूल, मदत व पुनर्वसन यांच्याकडे सादर केले आहे. सदर निवेदन जिल्हाधिकारी, पालघर यांचे कार्यालयास दिनांक ४/८/२०१७ रोजी प्राप्त झाले आहे. सरपंच, ग्रामपंचायत सातपाटी, ता.पालघर यांचे दिनांक ७/१०/२०१६ चे पत्र जिल्हाधिकारी, पालघर कार्यालयास दिनांक २८/१०/२०१६ रोजी प्राप्त झाले आहे.

(२) होय, हे खरे आहे.

(३) सदर निवेदनाच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी, पालघर यांनी दिनांक १४/१२/२०१७, दिनांक १६/१२/२०१७ व दिनांक २९/१२/२०१७ च्या पत्राने उपविभागीय अधिकारी, पालघर विभाग यांना नियमानुसार कार्यवाही करुन अहवाल सादर करण्याचे निर्देश दिले आहेत. त्यानुसार मौजे शिरगांव (सातपाटी), ता.जि.पालघर येथील ग.क्र. ४२४ व ५३९ या जमिनीवरील अनधिकृत बांधकामाबाबत उपविभागीय अधिकारी, पालघर यांनी दिनांक १७/२/२०१८ च्या पत्रान्वये महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम ५२, ५३ अन्वये अनधिकृत बांधकाम धारकांना नोटीसा दिलेल्या असून, अनधिकृत बांधकामे १ महिन्याच्या आत निष्कासित करण्याबाबत कळविले आहे. प्रकरणी उपविभागीय अधिकारी / जिल्हाधिकारी, पालघर यांचेस्तरावर कार्यवाही सुरु असून, शासनास चौकशी अहवाल प्राप्त झालेला नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील ९१५ माध्यमिक शाळांना वेतनेतर अनुदान देण्याबाबत

**(३८) ४०६०४ (२६-०२-२०१८) श्री.कपिल पाटील** : सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील ९१५ माध्यमिक शाळांना माहे मार्च, २००८ पासून १०० टक्के अनुदान मंजूर झाले आहे, किंवा त्या टप्प्यावर सदर शाळा आल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर शाळांना वेतनेतर अनुदान मिळालेले नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन राज्यातील ९१५ शाळांना वेतनेतर अनुदान देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, तसेच त्याची सद्य:स्थिती काय आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१३-०३-२०१८) :** (१), (२) व (३) दिनांक १ एप्रिल, २००८ रोजी वेतन अनुदानावर असलेल्या शालेय शिक्षण विभागांतर्गत राज्यातील खाजगी प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांतील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सन २००८ या वर्षी पाचव्या वेतन आयोगानुसार ज्या टप्प्यावर वेतन अनुदान अनुज्ञेय होते, त्या टप्प्यावरील देय वेतन अनुदानास गोठवून त्याच्या पाच टक्के प्रमाणे वेतनेतर अनुदान (चार टक्के वेतनेतर अनुदान व एक टक्का इमारत भाडे/देखभाल अनुदान) सन २०१३-२०१४ या आर्थिक वर्षापासून उपलब्ध करुन देण्यात आले आहे. सन २००८ नंतर १०० टक्के अनुदानावर आलेल्या शाळांबाबत उचित कार्यवाही करण्याचे प्रस्तावित आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील कनिष्ठ महाविद्यालयातील शिक्षकांच्या प्रलंबित मागण्या पूर्ण करण्याबाबत

**(३९) ४०६०६ (२६-०२-२०१८) ॲड.निरंजन डावखरे, श्री.नरेंद्र पाटील, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.सुभाष झांबड, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.मितेश भांगडिया :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील शिक्षकांना यापुर्वी लागू असलेली जुनी पेन्शन योजना लागू करणे, कायम विनाअनुदानित कनिष्ठ महाविद्यालयांना अनुदान देणे, सन २०१२ पासून नियुक्त केलेल्या शिक्षकांना नियुक्ती मान्यता देणे, सन २००३ ते २०११ पर्यंतच्या मंजूर वाढीव पदांवरील शिक्षकांना वेतन देणे, २४ वर्षाच्या

सेवेनंतर सर्वांना निवडश्रेणी देणे, तसेच ७ वा वेतन आयोग लागू करणे, इत्यादी प्रलंबित मागण्यांसंदर्भात शिक्षक संघटनांनी दिनांक ८ डिसेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास झालेल्या आंदोलनादरम्यान मा.शालेय शिक्षणमंत्री यांनी शिक्षकांच्या मागण्यांप्रकरणी शासनाचा सकारात्मक दृष्टीकोन असून त्यासंदर्भातील शासन आदेश काढण्याचे आश्वासन विधिमंडळाच्या हिवाळी, २०१७ च्या अधिवेशनात दिले होते, हे खरे आहे काय,

(२) तसेच राज्यातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांनी दिनांक १३ डिसेंबर, २०१७ ते १५ डिसेंबर, २०१७ पर्यंत विविध मागण्यांसाठी महाराष्ट्र राज्य शिक्षक परिषदेच्यावतीने नागपूर हिवाळी अधिवेशनावर धरणे आंदोलन करुन मागण्यांचे निवेदन शासनास दिले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, राज्यातील २० टक्के अनुदान प्राप्त शाळांना प्रचलित नियमानुसार अनुदान टप्पा लागू करावा, १ व २ जुलै रोजीच्या पात्र शाळांना तात्काळ निधी मंजूर करावा, अघोषित शाळा निधीसह घोषित कराव्यात, अतिरिक्त ठरणाऱ्या विनाअनुदानित शाळांमधील शिक्षकांना सेवा संरक्षण दयावे यासाठी राज्य कायम विनाअनुदानित शाळा कृती समितीतर्फे दिनांक १५ नोव्हेंबर, २०१७ रोजी एक दिवस शाळाबंद आंदोलन करण्यात आले असून यामध्ये मराठवाड्यातील ८० टक्के शाळांनी सहभाग घेतला आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर प्रलंबित मागण्यांच्या अंमलबजावणीबाबतचे आदेश न काढल्यास, दिनांक २ फेब्रुवारी, २०१८ पासून राज्यातील सर्व महाविद्यालये बंद करण्याची व त्यानंतर आंदोलन अधिक तीव्र करण्यात येईल असे निवेदन राज्यातील विविध कनिष्ठ महाविद्यालयाच्या प्राध्यापक व शिक्षक संघटना तसेच महाराष्ट्र राज्य कनिष्ठ महाविद्यालयातील शिक्षक महासंघाच्या शिष्टमंडळाने वाशी (नवी मुंबई) येथील एसएससी बोर्डाचे सचिव यांना माहे जानेवारी, २०१८ च्या पहिल्या आठवड्यात दिले, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर निवेदनाच्या अनुषंगाने मा.शालेय शिक्षण मंत्री महोदयांनी दिलेल्या आश्वासनानुसार कनिष्ठ महाविद्यालयातील शिक्षकांच्या प्रलंबित मागण्यांच्या पुर्ततेबाबत तसेच राज्यातील प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक शाळेतील शिक्षक, विशेष शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांच्याशी संबंधित केलेल्या विविध २२

मागण्यांच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१५-०३-२०१८)** : (१) अंशत: खरे आहे. कनिष्ठ महाविद्यालय शिक्षकांच्या मागण्यांबाबत दिनांक ३०/१/२०१८ रोजी मुंबई येथे बैठक आयोजित करण्यात आलेली होती.
(२) दिनांक १३/२/२०१७ व दिनांक १४/१२/२०१७ रोजीचे निवेदन प्राप्त झाले आहे, हे खरे आहे.
(३) राज्य कायम विनाअनुदानित कृति समिती तर्फे दिनांक १५ नोव्हेंबर, २०१७ रोजी एक दिवस शाळाबंद आंदोलन करण्यात आले होते परंतु, त्यामध्ये मराठवाड्यातील ८०% शाळांनी सहभाग घेतलेला नाही.
(४) दिनांक १८/१/२०१८ रोजी मोर्चा काढून आपल्या मागण्याबाबत निवेदन दिले आहे, हे खरे आहे.
(५) कनिष्ठ महाविद्यालयीन शिक्षकांच्या मागण्याबाबत झालेल्या बैठकीमध्ये काही मागण्या मान्य करण्यात आल्या असून उर्वरित मागण्यासाठी मा.वित्तमंत्री यांच्यासमवेत बैठक घेऊन निर्णय करण्याचे ठरले आहे.
(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## खंडगाव (ता.नायगाव, जि.नांदेड) येथील नुकसानग्रस्त शेतकऱ्यांना मदत देण्याबाबत

**(४०) ४०६८२ (२३-०२-२०१८) श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.सुभाष झांबड, श्री.आनंदराव पाटील** : सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) खंडगाव (ता.नायगाव, जि.नांदेड) येथील शेतकऱ्यांच्या शेतातील गंजींना आग लागून वैरण आगीत जळून नष्ट होऊन शेतकऱ्यांचे नुकसान झाल्याचे दिनांक ३० जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन नुकसानग्रस्त

शेतकऱ्यांना मदत देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०६-०३-२०१८) :** (१) होय.

(२) शासन निर्णय दिनांक १३ मे, २०१५ नुसार शेतातील गंजींना आग लागून वैरण आगीत जळून नष्ट झाल्यास नुकसान भरपाई देण्याची तरतूद नसल्याने नुकसान भरपाई देण्यात आलेली नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्य परिवहन महामंडळाच्या नोकर भरतीत दिव्यांगाना पदवीची अट रद्द करण्याबाबत

**(४१) ४०७२९ (२३-०२-२०१८) श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर, डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात उच्च शिक्षण विभाग किंवा विद्यापीठांच्याद्वारे कर्ण व मुकबधीर दिव्यांगासाठी कोणतीही दुभाषिकांची सोय नसून सदर दिव्यांगाना राज्य परिवहन महामंडळाच्या नोकर भरतीत पदवीची अट लावण्यात आली असल्याचे दिनांक २५ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या दिव्यांगांच्या मागण्यांसंदर्भात मा.मुख्यमंत्री यांच्यासोबत दिनांक १९ एप्रिल, २०१७ रोजी या दिव्यांगांच्या राज्यस्तरीय संघटनेच्या बैठकीत शासनाने त्यांच्या अटी मान्य करुनही त्याची अंमलबजावणी झाली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, त्यामुळे सदर संघटनेने पुणे ते मुंबई असा मोर्चा काढण्याचा इशारा दिला आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने राज्य परिवहन नोकर भरतीत दिव्यांगांना स्थान मिळावे म्हणून पदवी अट रद्द करुन त्यांच्या केलेल्या मागण्या मान्य

करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (१५-०३-२०१८) :** (१), (२), (३) व (४) महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळाकडून लिपिक-टंकलेखक (कनिष्ठ) पदाकरीता राज्य परिवहन नियमानुसार किमान शैक्षणिक अर्हता पदवी अशी निश्चित करण्यात आली असून माहे जानेवारी, २०१७ मध्ये जाहिरात देण्यात आली होती. त्यामध्ये महाराष्ट्रातील सर्व विभागांमध्ये कर्ण व मुकबधीर दिव्यांग उमेदवारांसाठी १ टक्के आरक्षण दर्शविण्यात आले आहे. सदर पदाची ऑनलाईन लेखीपरीक्षा घेण्यात आली आहे. दिव्यांगाच्या मागण्यांबाबत झालेल्या बैठकीमध्ये घेतलेल्या निर्णयाबाबत परिवहन विभागामार्फत वाहनपरवानाबाबत दिनांक ३१/०३/२०१७ रोजी परिपत्रकांन्वये कार्यवाही पूर्ण करण्यात आलेली आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## आचरे डोंगरेवाडी (ता.मालवण, जि.सिंधुदुर्ग) येथील विहिरीमधील गाळ काढण्याबाबत

**(४२) ४०८११ (०५-०३-२०१८) श्री.परिणय फुके :** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आचरे डोंगरेवाडी (ता.मालवण, जि.सिंधुदुर्ग) येथील पिण्याच्या पाण्याच्या सर्व विहिरीमध्ये गाळ साचल्याने पाण्याअभावी ग्रामस्थांची गैरसोय होत असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर विहिरीतील गाळ काढून, विहिरीचे खोदकाम केल्यास तेथे पाण्याचे झरे मिळण्याची शक्यता आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर विहिरीच्या नुतनीकरणाबाबत दिनांक ११ मार्च, २०१७ रोजीचे पत्र व दिनांक १५ मे, २०१७ रोजीचे स्मरणपत्र सरपंच, आचरे यांना पाठवूनही कोणतीच कार्यवाही करण्यात आली नाही, हे ही आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने ग्रामस्थांची पाण्याची गैरसोय दूर

करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?
**श्री.बबनराव लोणीकर (१६/३/२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.
डोंगरेवाडी येथील एका सार्वजनिक विहिरीमध्ये गाळ आहे.
(२) हे खरे नाही.
(३) व (४) या प्रकरणी दिनांक ११/०३/२०१७ चे पत्र ग्रामपंचायत, आचरा यांच्याकडे प्राप्त झाले आहे.

तथापि, आचरा ग्रामपंचायत क्षेत्रातील कोणतीच गावे जलयुक्त शिवार योजनेत समाविष्ट नाहीत. तसेच विहिरीची खोली ही सुमारे ५० फुट असल्याने विहिरीतील गाळ काढण्याचे काम मनुष्य बळाव्दारे करणे शक्य नसल्याचे निदर्शनास आले. सबब डोंगरेवाडी या वाडीमध्ये नवीन विंधन विहिर खोदून त्यावर लघु नळ योजना तयार करुन पाण्याची सोय करण्यात आली आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मिहान (जि.नागपूर) प्रकल्पासाठी कमी दराने वीज उपलब्ध करुन देण्याबाबत

**(४३) ४०८३७ (१५-०२-२०१८) श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, श्री.आनंदराव पाटील, डॉ.सुधीर तांबे, श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मिहान (जि.नागपूर) प्रकल्पासाठी कमी दराने वीज उपलब्ध होण्यासाठी नागपूर परिसरातील बंद पडलेले ऊर्जा प्रकल्प सुरु करण्याचा पर्याय तपासून त्यादृष्टीने प्रयत्न करावेत अशा सूचना मा.मुख्यमंत्री यांनी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीच्या (एमएडीसी) बैठकीत संबंधितांना दिनांक २८ डिसेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास दिल्या आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नागपूर परिसरातील कोणकोणते वीज प्रकल्प बंद आहेत ते सुरु करण्यास किती खर्च येणार आहे, त्यातून किती मेगावॅट वीज निर्मिती

होणार आहे व त्यासाठी किती कालावधी अपेक्षित आहे,

(३) असल्यास, सदर निर्माण होणारी ऊर्जा कोणत्या दराने मिहानला पुरविण्यात येणार आहे तसेच उक्त बंद ऊर्जा प्रकल्प तातडीने सुरु करण्याच्यादृष्टीने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०३-२०१८) :** (१) नागपूर परिसरातील बंद पडलेले विद्युत प्रकल्प संबंधितांनी सुरु केल्यास त्यांचेकडून स्वस्त दरात वीज खरेदी करण्याची शक्यता तपासून पाहण्याच्या सूचना मा.मुख्यमंत्री महोदयांनी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीच्या संचालक मंडळाच्या बैठकीत दिल्या आहेत.
(२) व (३) मिहान (जि.नागपूर) परिसरातील मे.अभिजीत एमएडीसी नागपूर एनर्जी प्रा.लि. (AMNEPL) कंपनीचा वीज प्रकल्प दिनांक ५/११/२०१३ पासून बंद आहे. सदर कंपनीने वित्तीय संस्थांकडून घेतलेल्या कर्जाच्या वसुलीबाबत राष्ट्रीय कंपनी कायदा न्यायासन, मुंबई यांचेसमोर प्रकरण सुरु आहे.

याखेरीज, नागपूर परिसरातील कोराडी व खापरखेडा औष्णिक विद्युत केंद्रातील काही संच तात्पुरते बंद आहेत. सदर संच कोळशाच्या उपलब्धतेनुसार व महाराष्ट्र वीज नियामक आयोग यांचे “मेरीट ऑर्डर डिस्पॅच” तत्त्वानुसार सुरु करण्यात येतील.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यातील पोलीस पाटलांच्या विविध प्रलंबित मागण्यांबाबत**

**(४४) ४०८३८ (२६-०२-२०१८) श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, श्री.आनंदराव पाटील, श्रीमती हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे : तारांकित प्रश्न क्रमांक ३५१७८ ला दिनांक १३ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील पोलीस पाटलांच्या मानधनात रुपये १५ हजारापर्यंत वाढ

करावी, हंगामी पोलीस पाटलांना कायम करावे, सेवानिवृत्तीनंतर वारसास सेवेत सामावून घ्यावे, निवृत्तीवेतन देण्यात यावे, सेवेची कालमर्यादा ६० वरुन ७० वर्षे करावी व राज्य शासकीय कर्मचाऱ्यांप्रमाणे सोयी-सुविधा मिळाव्यात इत्यादी मागण्या महाराष्ट्र राज्य पोलीस पाटील असोसिएशन तर्फे शासनाकडे सातत्याने करण्यात येत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यानुसार पोलीस पाटील, कोतवाल व अंगणवाडी सेविका इ. मानसेवी कर्मचाऱ्यांना सामाजिक सुरक्षा प्रदान करण्याकरीता “एकछत्र योजना” तयार करण्यासाठी अपर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १८ मार्च, २०१७ च्या शासन निर्णयान्वये एक अभ्यासगट नेमण्यात आला आहे व सदर अभ्यासगटाच्या शिफारशी प्राप्त झाल्यानंतर पोलीस पाटलांचे मानधन व अन्य सोयीसवलतींबाबत पुढील कार्यवाही करण्यात येणार आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त समितीचा अहवाल शासनास प्राप्त झाला आहे काय व केव्हा, तदनुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१४-०३-२०१८) :** (१), (२) व (३) राज्यातील पोलीस पाटीलांच्या मानधनात वाढ करणे, हंगामी पोलीस पाटीलांना कायम करणे, सेवानिवृत्तीनंतर वारसास सेवेत सामावून घेणे, निवृत्तीवेतन मिळणे, सेवेची कालमर्यादा वाढविणे, राज्य शासकीय कर्मचाऱ्यांप्रमाणे सोयी-सुविधा मिळणे इ. बाबत शासनाकडे सातत्याने मागण्या करण्यात येत आहेत.

दरम्यान कोतवालांना चतुर्थश्रेणी दर्जा देण्याबाबत व त्यांना चतुर्थश्रेणी दर्जा द्यावयाचा झाल्यास कोतवालांप्रमाणे इतरही मानधनावर असलेल्या सर्व कर्मचाऱ्यांच्या (उदा. पोलीस पाटील, आशा वर्कर्स, अंगणवाडी सेविका इ.) मागण्यांचा एकत्रित विचार करुन त्यांना सामाजिक सुरक्षा प्रदान करण्याकरीता, त्यांच्यासाठी “एकछत्र योजना” तयार करण्याकामी अभ्यास करुन शासनास शिफारस करण्यासाठी महसूल व वन विभागाच्या दिनांक १८/०३/२०१७ च्या आदेशान्वये अपर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली एका राज्यस्तरीय सचिव समितीची स्थापना करण्यांत आली आहे.

उपरोक्तप्रमाणे मानधनावरील कर्मचाऱ्यांना सामाजिक सुरक्षा प्रदान करण्यासाठी सोयी-सुविधा उपलब्ध करण्याच्या दृष्टीने शासनास शिफारशी करण्याच्या दृष्टीने समितीच्या दिनांक ११/१०/२०१७ व दिनांक १९/०१/२०१८ रोजी दोन बैठका झालेल्या असून त्या अनुषंगाने समितीमार्फत कार्यवाही सुरु आहे. समितीच्या शिफारशी अद्याप अप्राप्त आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## महिला सशक्तीकरण आणि आरोग्याच्या सुरक्षेसाठी पंतप्रधान मोफत गॅसची जोडणी योजनेबाबत

**(४५) ४१००४ (०१-०३-२०१८) श्री.हेमंत टकले, श्री.विक्रम काळे, श्री.नरेंद्र पाटील, श्री.किरण पावसकर, ॲड.जयदेव गायकवाड, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.सुनिल तटकरे, श्रीमती विद्या चव्हाण, ॲड.निरंजन डावखरे, श्री.ख्वाजा बेग, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महिला सशक्तीकरण आणि आरोग्याच्या सुरक्षेसाठी पंतप्रधान मोफत गॅसची जोडणी या योजनेंतर्गत सांगली जिल्ह्यात ६६४३२ महिलांनी अर्ज केले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर महिला अर्जदारांपैकी जिल्ह्यातील १६५०० महिलांचे अर्ज अपात्र ठरविण्यात आले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, त्याची कारणे काय आहेत व अपात्र ठरलेल्या लाभार्थींना पात्र ठरविण्याच्यादृष्टीने शासनाने कोणता निर्णय घेतला आहे,

(४) असल्यास, सदर योजनेंतर्गत गॅस शेगडीसाठी रुपये १६००/- मदत व उर्वरित रुपये १७११/- सबसिडीमधून कापून घेण्याच्या निर्णयामुळे सदर योजने ऐवजी ७२०/- रुपयात सद्य:स्थितीत गॅस सिलेंडर मिळत असल्याने या योजनेकडे बहुतांशी महिलांनी पाठ फिरवली असल्याने ही योजना अयशस्वी

ठरली आहे, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (१४-०३-२०१८) :** (१) व (२) सांगली जिल्हयात फेब्रुवारी, २०१८ पर्यंत ६७,१७८ महिलांनी प्रधानमंत्री उज्ज्वला योजनेंतर्गत गॅस जोडणी मिळण्यासाठी अर्ज केले होते. त्यापैकी १६,९८८ अर्ज अपात्र ठरविण्यात आले आहेत.

(३) सदर योजनेंतर्गत एक कुटुंब एक गॅस जोडणी देण्यात येते. ज्या कुटुंबात पुर्वीच गॅस जोडणी देण्यात आली असेल ते कुटुंब पुन्हा दुसरी गॅस जोडणी मिळण्यास अपात्र ठरविण्यात आले आहे.

(४) हे खरे नाही.

सदर योजनेंतर्गत पात्र लाभार्थ्यांना रुपये १६००/- (अनामत रक्कम व रेग्युलेटर) ही केंद्र शासनाकडून देण्यात येते. तर रुपये ९९०/- गॅस शेगडीकरीता व रुपये ७२१/-गॅस सिलेंडरकरीता असे एकूण रुपये १७११/- तेल कंपन्यांकडून कर्जरुपाने उपलब्ध करुन दिले जातात. सदर कर्जाची रक्कम ही लाभार्थ्यांना मिळणाऱ्या अनुदानातून वजा केली जाते. सांगली जिल्हयात सदर योजनेंतर्गत देण्यात आलेल्या गॅस जोडण्यांपैकी ६०% जोडण्यांवर दरमहा गॅस सिलेंडर घेण्यात येतात.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

### कायगाव (जि.औरंगाबाद) परिसरातील एका बिबटयाने धनगरपट्टी शिवारात हल्ला करुन शेळया खाल्याबाबत

**(४६) ४१०७६ (०५-०३-२०१८) श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कायगाव (जि.औरंगाबाद) परिसरातील एका बिबटयाने धनगरपट्टी

शिवारात हल्ला करुन ३ शेळया खाल्याचे दिनांक २५ नोव्हेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, वन विभागाच्या दुर्लक्षामुळे ग्रामस्थांमध्ये भिती निर्माण झालेली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन नुकसानग्रस्तांना नुकसान भरपाई देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (१९-०३-२०१८) :** (१), (२) व (३) कायगाव (जि.औरंगाबाद) परिसरात एका बिबटयाने धनगरपट्टी शिवारात हल्ला करुन ३ शेळया खाल्याचे दिनांक २५ नोव्हेंबर, २०१७ रोजी निदर्शनास आले नाही. तथापि, दिनांक १४/११/२०१७ रोजी गंगापूर तालुक्यातील वैजापूर वनक्षेत्रांतर्गत वाडगाव परिसरात श्री.कादर रज्जाक पठाण यांच्या मालकीच्या २ शेळया व १ बोकड, तडस या वन्यप्राण्यांच्या हल्ल्यात ठार झाल्याचे निदर्शनास आले आहे.

प्रस्तुत प्रकरणी प्रचलित शासन निर्णयातील तरतुदीनुसार संबंधित व्यक्तीस रु १५,०००/- अर्थसहाय्य अदा करण्यात आले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील दुष्काळग्रस्त भागातील शेतकऱ्यांना दिले जाणारे धान्य वितरण सुरु करण्याबाबत

**(४७) ४१११८ (२६-०२-२०१८) श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील दुष्काळग्रस्त भागातील शेतकऱ्यांना दिले जाणारे धान्य वितरण बंद करण्याचा निर्णय शासनाने घेतला असल्याचे दिनांक २३ नोव्हेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्यातील मराठवाडा विभागात यंदा दुष्काळ नसूनही कृषी समस्येने शेतकऱ्यांच्या आत्महत्येचे प्रमाण कमी झाले नाही, हे ही खरे आहे

काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शेतकऱ्यांना दिले जाणारे धान्य वितरण बंद न करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (०८-०३-२०१८) :** (१) हे खरे नाही.

राज्यातील १४ जिल्ह्यांमधील एपीएल (केशरी) शेतकऱ्यांना राज्य शासनाच्या खर्चाने सवलतीच्या दराने अन्नधान्य देण्यात येत असून माहे जून, २०१८ पर्यंतच्या अन्नधान्याचे जिल्हानिहाय नियतन देण्यात आले आहे.
(२) हे खरे नाही.

औरंगाबाद विभागात सन २०१५ मध्ये एकूण ११३३, सन २०१६ मध्ये १०५३, सन २०१७ मध्ये ९९१ शेतकरी आत्महत्यांची प्रकरणे निदर्शनास आली आहेत. त्यापैकी सन २०१५ मध्ये ८२५, सन २०१६ मध्ये ७५७, सन २०१७ मध्ये ७१० आत्महत्यांची प्रकरणे जिल्हाधिकारी यांच्याकडून पात्र ठरविण्यात आली आहेत. औरंगाबाद विभागात सन २०१७ मधील ८४ प्रकरणे चौकशीकरीता प्रलंबित असून उपरोक्त आकडेवारीनुसार आत्महत्येचे एकूण प्रमाण कमी झाल्याचे आढळून येते.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## दहिसर (पूर्व) आनंदनगर येथील आदिवासी समाजाची जमीन परत करण्याबाबत

**(४८) ४११४९ (०५-०३-२०१८) ॲड.अनिल परब :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) दहिसर (पूर्व) आनंदनगर येथील सर्व्हे नं. ३२७/४, ३२८/१०, ३२५/६ या आदिवासी (वारली) समाजाच्या जमिनीवर विकासक राजेश हिम्मतलाल शहा व मुकेश हिम्मतलाल शहा (नहालचंद लालूचंद प्रा.लि) यांनी अधिकाऱ्यांशी आर्थिक संगनमत करून उक्त भूखंडावर बहुमजली इमारती उभारण्याचे काम

सुरु केल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर प्रकरणी आदिवासी समाजाने मा.गृहनिर्माण राज्यमंत्री यांच्याकडे तक्रार निवेदन सादर करून हक्काची जमीन परत मिळण्याबाबत विनंती केलेली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार उक्त जमिनीवर सुरु असलेले इमारतीचे काम थांबवून सदर जमीन आदिवासी समाजाला परत करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२०-०३-२०१८) :** (१), (२) व (३) मौ. दहिसर, ता.बोरीवली येथील स.क्र. ३२७/४ व ३२८/१० बाबत राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांच्याकडे जानकीबाई ज्ञानोबा सुरनार व इतर यांचे दिनांक २४/११/२०१७ रोजीचे निवेदन प्राप्त झालेले आहे.

मौ. दहिसर, ता.बोरीवली येथील स.नं. ३२७/४, ३२८/१०, ३२५/६ या मिळकतीबाबत महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरणाच्या दिनांक ११/४/२०१७ च्या आदेशानुसार, श्रीमती यमुना रत्ना लाखात व इतर यांनी महाराष्ट्र जमीन महसूल, संहिता १९६६ च्या कलम ३६अ नुसार कार्यवाही करण्याकरीता दिनांक ११/८/२०१७ रोजी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांच्याकडे अर्ज दाखल केला आहे. त्यानुसार अप्पर जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांच्याकडे सुनावणीची कार्यवाही सुरू आहे. दिनांक १३/३/२०१८ रोजीच्या सुनावणीमध्ये अर्जदार यांचे कुळमुखत्यार यांनी दावा मिळकत विकसित करून बेकायदेशीर बांधलेले फ्लॅटस विकुन तिऱ्हाईत व्यक्तींचे हक्क निर्माण करीत असल्याने त्यास मनाई करणेबाबत अंतरिम आदेश पारित करणेबाबत विनंती केली होती. त्या विनंतीच्या अनुषंगाने अप्पर जिल्हाधिकारी यांनी या प्रकरणात सुनावणीच्या अंतिम तारखेपर्यंत “जैसे थे” परिस्थिती ठेवण्याचे आदेश दिनांक १३/३/२०१८ रोजी पारीत केलेले आहेत.

तसेच, मा.मुंबई उच्च न्यायालयाने सूट क्र. (L) २२३/२०१३ मधील नोटीस ऑफ मोशन नं. ८८०/२०१३ मधील दिनांक २२/४/२०१३ रोजीच्या अंतरिम आदेशान्वये मे.नहालचंद लालुचंद प्रा.लि. यांचे सदरहू ठिकाणी चालू असलेले काम स्थगित करण्यास नकार दिला आहे. या आदेशाविरुध्द श्रीमती लाखात व इतर यांनी केलेले अपिल मा.मुंबई उच्च न्यायालयाने निकाली काढले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजे माळशिरस (जि.सोलापूर) याठिकाणी न्यायालयाकरीता नवीन इमारत बांधण्याबाबत

**(४९) ४१२१० (०५-०३-२०१८) श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे माळशिरस (जि.सोलापूर) याठिकाणी दिवाणी व जिल्हा सत्र न्यायालय सुरु होऊन १० वर्षे कालावधी होऊनही सदर न्यायालयाचे कामकाज पूर्वीच्याच तालुका न्यायालयात सुरु असून ही इमारत अपुरी पडत असल्याने येथे नवीन सुसज्ज इमारत बांधण्याची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधींनी शासनाकडे केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नवीन इमारत बांधण्याचा प्रस्ताव शासनाकडे दाखल केला असून शासनाने त्याकडे दुर्लक्ष केल्याने नागरिकात नाराजीची भावना पसरली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून प्रस्तावाला मंजूरी देवून व निधीची तरतूद करुन येथे नवीन सुसज्ज न्यायालयाचे बांधकाम सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१५-०३-२०१८) :** (१) मा.स्थानिक लोकप्रतिनिधीचे पत्र शासनास प्राप्त झालेले नाही.

(२) मौजे माळशिरस (जि.सोलापूर) येथे नवीन इमारत बांधण्याबाबतचा प्रस्ताव, मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचेकडून दिनांक १६ सप्टेंबर, २०१७ च्या पत्रान्वये या विभागास प्राप्त झाला आहे. शासनाने सदर प्रस्तावाबाबत कार्यवाही केली असल्याने, शासनाने याकडे दुर्लक्ष केलेले नाही.

(३) चौकशीचा प्रश्न उद्‌भवत नसल्याने, याबाबत शासनाचे अभिप्राय निरंक आहेत. परंतु मौजे माळशिरस (जि.सोलापूर) येथे नवीन न्यायालय इमारत बांधण्याकरीता रुपये ४३,०६,३७,१२८/- इतक्या किंमतीचा प्रस्ताव प्रबंधक निरीक्षणे-२, मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचेकडून दिनांक १६ सप्टेंबर, २०१७ च्या पत्रान्वये या विभागास प्राप्त झाला आहे. सदर प्रस्तावास सार्वजनिक बांधकाम विभागाने रुपये ४४५४.४४ लक्ष इतक्या किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दर्शविली आहे. सदर प्रस्ताव प्रशासकीय मान्यतेसाठी नियोजन व वित्त विभागास दिनांक १५ नोव्हेंबर, २०१७ रोजी सादर करण्यात आला. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने नियोजन विभागाने अधिक माहिती उपलब्ध करुन देण्याबाबत विनंती केली होती. त्यानुसार सदर माहिती प्रबंधक, मा.उच्च न्यायालय (निरीक्षणे-२), अपील शाखा, मुंबई व प्रमुख जिल्हा व सत्र न्यायालय, सोलापूर यांचेकडून दिनांक १५ जानेवारी, २०१८ च्या पत्रान्वये मागविण्यात आली असता, माहिती प्रमुख जिल्हा व सत्र न्यायालय, सोलापूर यांचेकडून दिनांक २५ जानेवारी, २०१८ च्या पत्रान्वये प्राप्त झाली आहे. त्यानुसार सदर माहिती नियोजन विभागास दिनांक ६ फेब्रुवारी, २०१८ च्या टिप्पणीन्वये सादर केलेली आहे. तरी सदर प्रस्ताव तद्‌नंतर वित्त विभागास सादर करण्यात येईल. तसेच सदर प्रस्तावाची किंमत रुपये ५.०० कोटी पेक्षा जास्त असल्याने सदर प्रस्ताव मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील सचिव समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात येणार आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## टेम्पल रोझ ग्रुप ऑफ कंपनीने गुंतवणूकदारांची फसवणूक केल्याबाबत

**(५०) ४१२१५ (०३-०३-२०१८) श्री.अनिल भोसले : तारांकित प्रश्न क्रमांक ३२३५० ला दिनांक २ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) टेम्पल रोझ ग्रुप ऑफ कंपनीने गुंतवणूकदारांना त्यांच्या गुंतवणुकीवर आकर्षक व्याजाचे/ प्लॉटचे आमिष दाखवून हजारो गुंतवणूकदारांची सुमारे ३०० कोटी रुपयांची फसवणूक केली असून सदर कंपनीविरुध्द आर्थिक गुन्हे विभाग, पुणे शहर यांनी गुन्हा दाखल केल्यानंतर कायदेशीर प्रक्रिया पूर्ण करण्यास पोलिसांकडून दिरंगाई व टाळाटाळ होत असल्याची बाब माहे फेब्रुवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर कंपनीकडून आर्थिक गुंतवणूकदारांना त्यांची गुंतवणूक व परतावा परत मिळण्यासाठी पोलिसांकडून तपासणीत होत असलेली दिरंगाई व टाळाटाळबाबत पोलिसांची व उक्त प्रकरणाची शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार कंपनीविरुध्द व पोलिसांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१७-०३-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) सदर प्रकरणी आर्थिक गुन्हे शाखा, मुंबई येथे गु.र.क्र. ०८/१७, भा.दं.वि. कलम ४०९, ४२०, १२०(ब) सह कलम ३, ४ महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थांमधील) हितसंबंधाचे संरक्षण अधिनियम, १९९९ व कलम ३, ४ व ५ पीसीएमसीबी कायदा, १९७८ अन्वये गुन्हा दाखल करण्यात आला असून सदर गुन्हा तपासाधीन आहे.

तसेच, पुणे शहर पोलीस आयुक्तालय कार्यक्षेत्रात दोन गुन्हे दाखल आहेत. १) चतुःश्रृंगी पोलीस स्टेशन येथे गु.र.क्र. २७५/१७, भा.दं.वि. कलम ४०९, ४२०, ४६७, ४६८, १२०(ब), ३४ सह कलम ३, ४ महाराष्ट्र ठेवीदारांच्या

(वित्तीय संस्थांमधील) हितसंबंधाचे संरक्षण अधिनियम, १९९९ व कलम ३, ४ व ५ पीसीएमसीबी कायदा, १९७८ अन्वये गुन्हा नोंद. २) लष्कर पोलीस स्टेशन येथे गु.र.क्र. ६०/१७, भा.दं.वि. कलम ४०९, ४२०, ३४ सह कलम ३ महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थांमधील) हितसंबंधाचे संरक्षण अधिनियम, १९९९ अन्वये गुन्हा नोंद. सदर दोन्ही गुन्हयामध्ये दोषारोपपत्र दाखल करण्यात आले असून फौजदारी प्रक्रिया संहिता कलम १७३ (८) अन्वये पुढील तपास सुरू आहे.

नमुद गुन्हयात ६ आरोपींना अटक करण्यात आलेली आहे. या गुन्हयांतील आरोपींच्या जप्त मालमत्तेची अधिसूचना शासन स्तरावरुन दिनांक ०२/११/२०१७ रोजी निर्गमित करुन राजपत्रात प्रसिध्द करण्यात आलेली आहे. या अधिसूचनेन्वये एकूण ३४२ स्थावर मालमत्ता व ५५ जंगम मालमत्ता संरक्षित करण्यात आलेल्या आहेत. तसेच, या मालमत्तेची निर्गती होण्यासाठी महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थांमधील) हितसंबंधांचे संरक्षण अधिनियम, १९९९ अंतर्गत सदर प्रकरणी नियुक्त सक्षम प्राधिकारी, उपजिल्हाधिकारी (सामान्य), मुंबई शहर यांचेमार्फत पुढील आवश्यक कार्यवाही करण्यात येत आहे. सदर गुन्हयाच्या तपासामध्ये पोलीसांकडून कोणत्याही प्रकारची दिरंगाई अथवा टाळटाळ झालेली नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विधान भवन :** **डॉ. अनंत कळसे**
**नागपूर.** **प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मुद्रणालय, नागपूर.